


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






## अनुक्रमणिका



---


संपादक : प्र.ना. परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

मुखपृष्ठावरील रेखाचित्र : अनिल अवचट. मांडणी : विनय सायनेकर, सुप्रिया खारकर

संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५

मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. दूरध्वनी (०२०) २४३४८७५६


---


प्रकाशन : त्रैमासिक: जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य रु. २५/-**

# साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षाची निवड अशी करता येईल ?

मराठी भाषेच्या क्षेत्रात दर वर्षी होणारी एक महत्त्वाची घटना म्हणजे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन. संमेलनाचे अध्यक्षपद अतिशय मानाचे समजले जाते आणि ते मिळविण्यासाठी मान्यवर साहित्यिकांनाही अखिल भारतीय साहित्य महामंडळाच्या सभासद-संस्थांपैकी एका तरी संस्थेचे सभासद असावे लागते आणि अध्यक्षपदाच्या निवडणुकीला उभे राहून निवडून यावे लागते. या अटी मान्य नसलेले साहित्यिक कितीही मान्यवर असले तरी त्यांना अध्यक्षपदाचा मान मिळू शकत नाही. त्यामुळे विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर, विजय तेंडुलकर यांच्यासारखे साहित्यिक अध्यक्षपदापासून दूर राहिले आहेत.

साहित्याच्या क्षेत्रात लोकशाहीच्या नावाखाली निवडणुकीच्या राजकारणाला प्रवेश असावा का, हा एक चिंत्य प्रश्न आहे. जोपर्यंत उमेदवार लायक असतात आणि प्रचार निकोप असतो तोपर्यंत निवडणुकीला आक्षेप घेण्याचे कारण नसते. पण निवडणूक जिंकण्यासाठी वाममार्गाचा अवलंब होऊ लागतो त्या वेळी निवडणुकीबद्दलच प्रश्नचिन्ह निर्माण होऊ लागते. निवडणूक म्हटले की मतदार आले; हे मतदार ठरविण्याचा अधिकार साहित्य महामंडळाच्या सभासद-संस्थांच्या पदाधिकाऱ्यांना आणि संमेलनाच्या स्वागत-समितीला असतो. पूर्वी मतदारांची संख्या मर्यादित होती आणि त्यात स्वागत-समितीच्या सदस्यांचे बहुमत असे, त्या वेळी वजनदार प्रकाशक आपल्या साहित्यिकाला निवडून आणू शकत. पु.भा. भावे विरुद्ध प्रभाकर पाध्ये अशी निवडणूक झाली तेव्हा साहित्यिकाच्या राजकीय विचारसरणीवर लक्ष केंद्रित झाले आणि आपल्या विचारसरणीचा माणूस निवडून यावा म्हणून स्वागत-समितीच्या सदस्यत्वासाठी गर्दी झाली.

नंतरच्या वर्षांत महामंडळाच्या सभासद-संस्थांना मतदारांची संख्या ठरवून देण्यात आली आणि स्वागत-समितीच्या सभासद-मतदारांची संख्या मर्यादित करण्यात आली. मतदार कोण असावेत हे ठरविण्याचा अधिकार मिळाल्यामुळे कुणाला निवडून आणावयाचे हे ठरविणे साहित्य-संस्थांच्या पदाधिकाऱ्यांना शक्य होऊ लागले आणि साहजिकच साहित्य-संस्थांचे कार्याध्यक्ष 'किंगमेकर' बनले; त्यांच्या दाढीला हात लावून अध्यक्षपदाचे दान आपल्या झोळीत पाडून घेणे पुरेशी पात्रता नसलेल्या

साहित्यिकांनाही शक्य होऊ लागले. परिणामत: याबद्दलही आता असमाधान व्यक्त होऊ लागले आहे. या पद्धतीतून निवडून आलेले संमेलनाध्यक्षही या पद्धतीला आक्षेप घेणारे नक्राश्रू ढाळू लागले आहेत.

सध्याच्या निवडणूक-पद्धतीबद्दल पुनर्विचार करण्यासाठी हीच वेळ योग्य आहे. संमेलनाच्या पूर्वी करण्यात आलेल्या सर्व सूचनांचा संमेलनात विचार करून निर्णय केला तरच पुढच्या वर्षीच्या अध्यक्षाची निवड नव्या पद्धतीने होऊ शकेल; नाही तर 'येरे माझ्या मागल्या'ला पर्याय उरणार नाही.

कोणत्याही निवडणुकीत/निवड-प्रक्रियेत तीन घटक अपरिहार्य असतात; निवडणूक घेणारी संस्था, निवडून येऊ इच्छिणारे उमेदवार आणि मतदार. निवडणूक घेणाऱ्या संस्थेने फक्त निवडणूक घ्यावी, निवडणुकीवर प्रभाव टाकण्याचा, एखाद्या उमेदवाराची तळी उचलून धरण्याचा प्रयत्न करू नये. म्हणजेच मतदार कोण असावेत हे ठरविण्याचा अधिकार निवडणूक घेणाऱ्या संस्थेला असू नये; त्या(ति)ने पत्राने, प्रसार-माध्यमाला दिलेल्या मुलाखतीतून किंवा एखाद्या अन्य मार्गाने इच्छा किंवा अपेक्षा व्यक्त करणे पुरेसे ठरावे. या प्रक्रियेतील तिसरा घटक हा सर्वांत महत्त्वाचा ! मतदारसंघ दोन स्तरांवर असावेत. पहिला स्तर सर्वसाधारण मतदारांचा - त्यांत साहित्यिक, प्रकाशक, मुद्रक, मुखपृष्ठे-रेखाचित्रे करणारे चित्रकार इत्यादी साहित्याशी संबंधित असणाऱ्या सर्व घटकांचा समावेश असावा. त्यांचे प्रमाण ६०:२५:१५ (म्हणजे साहित्यिक ६० टक्के, प्रकाशक २५ टक्के व मुद्रक-चित्रकार १५ टक्के) असे असावे. त्यांची एकूण संख्या एक हजारापासून पाचदहा हजारांपर्यंत कितीही असण्यास हरकत नाही. पण त्यांची निवड व्यक्तिनिरपेक्ष, वस्तुनिष्ठ पद्धतीने व्हावी. उदाहरणार्थ, साहित्यसंस्थांचे सर्व सर्वसाधारण सभासद, किंवा प्रकाशन-डायरीत समाविष्ट असणारे साहित्यिक, प्रकाशक, चित्रकार, मुद्रक इत्यादी. या सर्व मतदारांनी अध्यक्षपदासाठी त्यांना योग्य वाटणाऱ्या दहा साहित्यिकांची नावे महामंडळाला कळवावी. यानंतरचा मतदारसंघ लहान - सुमारे शंभर - मतदारांचा असावा. त्यात महामंडळाच्या सदस्य-संस्थांचे सर्व पदाधिकारी, सर्व माजी संमेलनाध्यक्ष व पहिल्या मतदारसंघाकडून महामंडळाकडे आलेल्या साहित्यिकांच्या नावांपैकी पहिले पंचवीस साहित्यिक यांचा समावेश असावा. या दुसऱ्या मतदारसंघाने महामंडळाकडे आलेल्या नावांतील पहिल्या दहा साहित्यिकांच्या नावांचा अध्यक्षपदासाठी विचार करून त्यातील एकाची अध्यक्षपदासाठी निवड करावी.

ही सूचना अतिशय प्राथमिक स्वरूपाची आहे. तिच्यात योग्य ते बदल करावेत, मते मागवावीत, चर्चा घडवून आणाव्यात आणि साहित्य-संमेलनात त्याबद्दल निर्णय

करा. ही पद्धत काहींना गुंतागुंतीची वाटण्याची शक्यता आहे. काहींना ती वेळखाऊ वाटण्याची शक्यता आहे, पण या पद्धतीमुळे साहित्य-संस्थांच्या सर्वसामान्य सभासदांना या प्रक्रियेत सहभागी होण्याची संधी व समाधान मिळेल. त्यांच्याकडून येणाऱ्या दहा नावांमधूनच अंतिम निवड करावयाची असल्याने दुसऱ्या मतदारसंघाला मनमानी करता येणार नाही. दुसऱ्या (याला आपण वरिष्ठ मतदारसंघ म्हणायलाही हरकत नाही) मतदारसंघात संभाव्य दहा उमेदवारांचाही समावेश असल्यामुळे त्यांच्या संमतीचा प्रश्नही मार्गी लागेल. शिवाय साहित्यसंस्थांच्या सर्वसाधारण सभासदांची मोठी संख्या व त्यांनी निवडावयाच्या संभाव्य उमेदवारांची दहा ही मोठी संख्या आणि तीही पहिल्या टप्प्यावरीलच निवड असण्यामुळे प्रचारावर आपोआपच मर्यादा येतील. शिवाय या पद्धतीमुळे साहित्यिकांनी उमेदवारीअर्ज भरणे व साहित्यसंस्थांच्या प्रतिनिधींना प्रसन्न करून घेणे, असे मानहानीकारक प्रकारही टळतील. ■

**प्र. ना. परांजपे**

---

**मुखपृष्ठासंबंधी :**

'भाषा आणि जीवन'च्या २००५, २००६, २००७ या तीन वर्षांतील सर्व (१२) अंकांची मुखपृष्ठे प्रा. विनय सायनेकर व श्रीमती सुप्रिया खारकर यांनी तयार केली आहेत. त्यांचा परिचय पुढे दिला आहे.

**विनय सायनेकर :** सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालयात गेली २३ वर्षे अध्यापन. सुलेखनकला-कॅलिग्राफी, क्रियेटीव विज्युअलायझेशन या विषयात विशेष रस. भारतीय लिप्यांचे संगणकावर संकल्पन हा देखील अभ्यासाचा विषय आणि त्यात व्यावसायिक स्तरावर कार्य.

**सुप्रिया खारकर :** सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालयातून पदवी. अक्षर-लेखन हा विशेष अभ्यासाचा आणि आवडीचा विषय. संगणकावर संकल्पनांत विशेष प्रावीण्य. सध्या सीडॅक - जुहू, मुंबई येथे कार्यरत.

या वर्षी मुखपृष्ठावर अनिल अवचट यांची रेखाचित्रे देणार आहोत. अनिल अवचट यांचा वेगळा परिचय देण्याची आवश्यकता नाही. मराठी अभ्यास परिषदेशी त्यांचा गेली पंचवीस वर्षे सहकार्य-संबंध आहे. मांडणी : सायनेकर व खारकर.

---

# सामाजिक संदर्भात भाषेचा अभ्यास

– विल्यम लबव
भाषांतर : मिलिंद मालशे आणि विवेक भट

[विल्यम लबव (जन्म : ४ डिसेंबर, १९२७) : हार्वर्ड विद्यापीठामध्ये रसायनविज्ञानाचे शिक्षण घेऊन लबव यांनी १९४९-६१ या काळात रसायन-उद्योगाच्या क्षेत्रात काम केले. त्यानंतर ते भाषाविज्ञानाकडे वळले आणि मार्थाझ विन्यार्ड या बेटावरील इंग्लिश भाषेत होणाऱ्या बदलावर संशोधन करून त्यांनी एम.ए. ही पदवी मिळविली (१९६३). हे संशोधन लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ अमेरिका या संस्थेच्या एका बैठकीत सादर करण्याची संधी त्यांना मिळाली व त्यानंतर ते सामाजिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातील संशोधक म्हणून ख्यातनाम झाले. कोलंबिया विद्यापीठामधून पीएच.डी. ही पदवी मिळवून त्यांनी तेथे १९६४-७० या काळात अध्यापनही केले. १९७१मध्ये पेनसिल्वेनिया विद्यापीठात प्राध्यापकपदावर आणि १९७७मध्ये या विद्यापीठाच्या भाषावैज्ञानिक प्रयोगशाळेच्या संचालकपदावर त्यांची नेमणूक झाली.

सामाजिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रामध्ये लबव यांनी लक्षणीय भर घातलेली आहे. बोलींमध्ये स्वनात्मक परिवर्तने कशी घडून येतात, त्यांतून सामाजिक संरचनेविषयी कशी मर्मदृष्टी मिळते, हे प्रश्न त्यांच्या संशोधनामध्ये पायाभूत ठरलेले आहेत. न्यूयॉर्क शहरामध्ये वापरल्या जाणाऱ्या इंग्लिश भाषेच्या विविध भेदप्रकारांविषयी त्यांनी प्रचंड सामग्री गोळा केली व त्यासाठी एक अभिनव स्वरूपाची संशोधनपद्धती वापरली. त्यांचे हे संशोधन म्हणजे सामाजिक बोलीविज्ञानाच्या क्षेत्रातील महत्त्वाचा टप्पा मानला जातो. 'दि सोशल स्ट्रॅटिफिकेशन ऑफ इंग्लिश इन न्यूयॉर्क सिटी' (१९६६) या ग्रंथामध्ये त्यांच्या या संशोधनाचे संकलन झालेले आहे. भाषेचे बोली-भेद आणि सामाजिक स्तरीकरण यांच्या संबंधांविषयीचे हे संशोधन आहे.

ॲफ्रोअमेरिकन बोलींवर त्यांनी केलेल्या संशोधनामुळे या बोलींना प्रतिष्ठा मिळण्यास बरीच मदत झालेली आहे. प्रमाण व प्रमाणेतर बोली यांच्यातील संबंधांकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोण त्यांनी आपल्या संशोधनातून मांडलेला आहे आणि प्रमाणेतर बोलींच्या संशोधनाचा एक वस्तुपाठ घालून दिलेला आहे. भाषेमध्ये सामाजिक पातळीवर भेद कसे निर्माण होतात या विषयीच्या संशोधनाला भेदनिष्ठ सामाजिक

भाषाविज्ञान (व्हेरिएशनिस्ट सोश्योलिंग्विस्टिक्स) म्हणतात. लबव हे या प्रकारच्या भाषिक अभ्यासाचे प्रणेते मानले जातात. 'लँग्विज इन दि इनर सिटी : स्टडीज इन ब्लॅक इंग्लिश व्हर्नक्युलर' (१९७२) आणि 'सोश्योलिंग्विस्टिक पॅटर्न्ज' (१९७२) या त्यांच्या ग्रंथांमधून भेदनिष्ठ सामाजिक भाषाविज्ञानाची संशोधनपद्धती विकसित झालेली दिसते. उत्तर अमेरिकेतील इंग्लिशच्या बोलींवर सखोल संशोधन करून ॲश आणि बोबर्ग या सहकाऱ्यांच्या साहाय्याने त्यांनी एक भाषिक नकाशा तयार केलेला आहे. 'दि ॲटलस ऑफ नॉर्थ अमेरिकन इंग्लिश : फनेटिक्स, फनॉलजि अँड साउंड चेंज' (२००६) या नावाने तो प्रसिद्ध झालेला आहे.

ॲफ्रोअमेरिकन मुलांच्या वाचनप्रक्रियेचे संशोधन करून त्यांना प्रमुख सामाजिक प्रवाहात सामील करून घेण्यासाठी कोणत्या प्रकारची वाचन-सामग्री उपलब्ध करून द्यावी व कोणत्या अध्यापनपद्धती वापराव्या, याविषयीसुद्धा लबव यांनी मांडणी केलेली आहे. सर्वसामान्य लोक आपल्या स्वतःच्या जीवनविषयक कहाण्या कशा रचतात याची कथनमीमांसा हे लबव यांच्या संशोधनाचे आणखी एक विषयसूत्र आहे.] ■

## संशोधन-पद्धती

भाषिक समाजाविषयी करायचे संशोधन या विषयावरील कोणत्याही अभ्यासक्रमा-मध्ये संशोधनाचा प्रारंभ कसा करावा, ''लोकांशी काय बोलावे ?'' हा प्रश्न खूपच वेधक आहे. हा प्रश्न क्षुल्लक निश्चितच नाही. माहितीदार शोधणे, त्यांच्याशी संपर्क साधणे, आणि ध्वनिमुद्रित करायच्या मुलाखतीसाठी त्यांना बोलते करणे, या सुरुवातीच्या पायऱ्या म्हणजे विद्यार्थ्यांसाठी मोठ्या कठीण समस्या ठरतात. या प्रश्नांकडे दुर्लक्ष करणे चूकच आहे; कारण या संशोधनासाठी ज्या पद्धती व तंत्रे विकसित केलेली आहेत त्यांत भाषिक व सामाजिक वर्तनाची महत्त्वाची तत्त्वे सामावलेली आहेत. ही संशोधनपद्धतीविषयक गृहीतके व निष्कर्ष यांच्याकडे बारकाईने पाहिल्यास संभाषिताचे स्वरूप आणि भाषेची कार्ये यांविषयी आपल्याला खूप काही समजू शकेल.

एखादी व्यक्ती जे काही बोलते ते का बोलते हे जाणून घेण्याच्या गरजेमधून सामाजिक भाषाविज्ञानातील मूलभूत प्रश्न उद्‌भवलेला आहे. माहितीचे नमुने निवडणे व ते ध्वनिमुद्रित करणे यांच्या पद्धतीविषयी ज्या समस्या आहेत त्या केवळ या मूलभूत प्रश्नाचा बाह्य आविष्कार आहेत. योग्य माहितीसामग्रीसाठी – विशेषतः नैसर्गिक बोलण्याचे व्याकरणदृष्ट्या विश्लेषण करण्यासाठी – योग्य प्रकारे ध्वनिमुद्रण होणे आवश्यक आहे. चल-घटकांची व्याख्या करून ते सुटे काढले की नंतर हस्तलिखित टिपणांवरूनही बरेच काही करता येण्यासारखे आहे. परंतु भाषिक समाजाकडे

पाहण्याचा आपला प्रारंभिक दृष्टिकोण मात्र नैसर्गिक बोलण्याचे व्यवस्थित ध्वनिमुद्रित केलेले बरेचसे नमुने मिळविण्याच्या गरजेने नियंत्रित होत असतो.

क्षेत्रीय संशोधनप्रकल्पांच्या निष्कर्षांवरून संशोधनपद्धतीविषयी पाच सिद्ध तत्त्वे आपल्याला वेगळी काढता येतात. त्यांतून संशोधनपद्धतीसंबंधी एक विरोधाभास निर्माण होतो, व त्याचे निरसन करणे हीच केंद्रवर्ती समस्या आहे. ही पाच सिद्ध तत्त्वे पुढीलप्रमाणे :

**शैली-बदल :** नित्य एकाच शैलीत बोलणारे लोक सहसा आढळत नाहीत. काही माहितीदारांच्या शैलीतील बदलाची कक्षा इतरांपेक्षा खूपच विस्तृत असते हे तर आहेच; परंतु बदलत्या सामाजिक संदर्भानुसार आणि विषयानुसार प्रत्येकच भाषकाच्या बोलण्यात काही भाषाविषयक घटक बदलतात, असे आम्हाला आढळले आहे. बोलणारी व्यक्ती स्वतःच ज्या काही लहानसहान सुधारणा करीत असते त्यांना जवळ जवळ नेहमी एक विशिष्ट दिशा असते. व त्यावरून या बदलांचा गुणात्मक शोध घेता येतो.

**अवधान :** संशोधक कितीतरी शैली व शैलीच्या कक्षा वेगळ्या करून दाखवू शकतात, परंतु आम्हांला असे दिसून आले आहे की शैलींची मांडणी एका विशिष्ट दिशेच्या अनुषंगाने करता येते आणि बोलण्याकडे किती प्रमाणात अवधान पुरविले गेले आहे त्यावरून त्याचे मापनही करता येते. स्वतःचे बोलणे ऐकता-ऐकता त्याचे नियमन करणे हा बोलण्याकडे अवधान पुरविण्याचा सगळ्यात महत्त्वाचा मार्ग आहे, परंतु अन्य प्रकारेही बोलण्याचे नियमन होतच असते. [१] ज्यात भावनिक गुंतवणूक नाही अशा प्रकारच्या अनौपचारिक बोलण्यात जेवढ्या प्रमाणात भाषा-भेदाचे महत्त्वाचे घटक आढळतात, तेवढ्याच प्रमाणात ते घटक लोक जेव्हा उत्तेजित होऊन भावनेच्या आत्यंतिक भरात बोलतात तेव्हाही आढळतात. यावरून आमच्या वरील सिद्ध तत्त्वाला (खरे म्हणजे अभ्युपगमाला) पुष्टी मिळते. अशा दोन प्रकारच्या बोलण्यातील समान धागा म्हणजे त्यांत स्वतःच्या बोलण्याचे नियमन करण्याकडे कमीत कमी अवधान पुरविलेले असते.

**स्थानिक बोली :** शैलीचा एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंतचा हा जो अखंड पट आहे त्यातील प्रत्येक टप्पा हा भाषावैज्ञानिकाच्या दृष्टीने सारख्याच महत्त्वाचा नसतो. काही शैलींमध्ये स्वनात्मक व व्याकरणात्मक पातळ्यांवर अनियमितता असते आणि त्याचबरोबर त्यामध्ये अवाजवी सुधारणाही केलेली दिसते. इतर काही शैलींमध्ये भाषिक नियमितता अधिक आढळते व भाषांच्या उत्क्रांतीची दिशा ठरविणारे मूलभूत परस्परसंबंध त्यामध्ये आपल्याला सापडतात. या अशा शैली म्हणजे स्थानिक बोली

होत. त्यांमध्ये बोलण्याचे नियमन करण्याकडे कमीत कमी अवधान पुरविले जाते. या स्थानिक बोलींच्या निरीक्षणावरून भाषांच्या घडणीच्या अभ्यासासाठी आवश्यक असणारी अत्यंत पद्धतशीर स्वरूपाची सामग्री आपल्या हाती लागते.

**औपचारिकता :** ज्यात बोलण्याकडे थोडे का होईना अवधान दिले गेले आहे अशा बोलण्याला औपचारिक संदर्भ असतो. बोलणाऱ्याचे पद्धतशीर निरीक्षण करून आपल्याला तो ठरविता येतो. मुलाखतीच्या मुख्य भागात आपण मागितलेली माहिती आपल्याला मिळते; परंतु त्यात स्थानिक बोलीचा वापर होण्याची शक्यता नसते. बोलणारा[भा१] कितीही अनौपचारिकपणे किंवा मैत्रीपूर्वक बोलतो आहे असे भासले तरी त्याहून अधिक अनौपचारिक शैली त्याच्यापाशी आहे असे गृहीत धरायला हवे. त्या अधिक अनौपचारिक शैलीत तो आपल्या मित्रांबरोबर थट्टामस्करी करीत असेल आणि आपल्या पत्नीबरोबर वादही घालीत असेल.

**अस्सल माहितीसामग्री :** बोलण्याचे नमुने मिळविण्याचे इतर कोणतेही मार्ग अवलंबिले (गटागटाने चर्चा, बोलणाऱ्याच्या नकळत निरीक्षण, इ.) तरीसुद्धा कोणाही व्यक्तीच्या बोलण्याविषयी अस्सल व पुरेशी माहितीसामग्री मिळविण्याचा एकमेव मार्ग म्हणजे त्या व्यक्तीची मुलाखत घेणे आणि तिचे ध्वनिमुद्रण करणे. पद्धतशीर निरीक्षणाचा हा सर्वांत साधासरळ उपाय आहे.[६]

**निरीक्षणविषयक विरोधाभास :** शेवटी आपण निरीक्षणविषयक विरोधाभासाकडे[भा२] येऊन पोहोचतो. भाषिक समूहात भाषाविषयक संशोधन करण्याचा मूळ उद्देश म्हणजे कोणाच्याही निरीक्षणाखाली नसताना त्या समाजातील लोक कसे बोलतात हे शोधणे. परंतु प्रत्यक्षात ही माहिती आपल्याला पद्धतशीर निरीक्षणातूनच मिळत असते. अर्थात हा पेच न सुटणारा नाही. एकतर औपचारिक मुलाखतीला इतर माहितीची जोड देण्याचे काही उपाय आपण शोधले पाहिजेत किंवा मुलाखतीची संरचना काही ना काही मार्गाने बदलली पाहिजे. या आधी ज्या विविध प्रयोगांचा आपण उल्लेख केला ते सगळेच काही या विरोधाभासावर मात करू शकलेले नाहीत. बऱ्याच संशोधकांनी एका मर्यादित शैलीविषयक माहितीसामग्रीवरच आपले काम भागविले आणि शैलींच्या पटाच्या औपचारिक भागावर लक्ष केंद्रित केले. मात्र गम्पर्झ यांच्या संशोधनात, माझ्या स्वतःच्या न्यूयॉर्क शहराच्या संशोधनात व शहरी बकाल वस्त्यांमधील संशोधनात, तसेच फिशमन-गंपर्झ-मा यांच्या जर्सी शहरातील संशोधनप्रकल्पात स्थानिक बोलींचा पद्धतशीर अभ्यास झालेला आहे.

विविध उपायांनी माहितीदार व्यक्तीचे आपल्या बोलण्याकडे असलेले अवधान अन्यत्र वळवून मुलाखतीच्या वेळी पडणाऱ्या बंधनापासून सुटका करून घेतली आणि

स्थानिक बोलींना पुढे येण्यास वाव दिला तर वर उल्लेखिलेल्या विरोधाभासावर मात करण्याचा तो एक मार्ग ठरेल. त्यासाठी मुलाखत अधून मधून अशा तऱ्हेने थांबविता येईल की त्या वेळी मुलाखत चालू नाही अशी माहितीदार व्यक्तीची अजाणताच समजूत होईल (Labov, 1966). पूर्वी कधी माहितीदाराच्या मनात तीव्र स्वरूपाच्या भावना उद्‌भवल्या असतील त्या पुन्हा जागृत होतील अशा प्रकारच्या प्रश्नोत्तरांत आणि विषयांत त्या व्यक्तीला गुंतविता येईल किंवा इतर अशाच एखाद्या संदर्भामध्ये तिला ओढता येईल. या प्रकारचा सर्वात यशस्वी ठरणारा प्रश्न म्हणजे ''मरणाच्या भीती''-विषयीचा प्रश्न होय : ''मरणाचा धोका उद्‌भवण्याची दाट शक्यता आहे अशा परिस्थितीत तुम्ही कधी सापडला आहात का ?'' या प्रश्नाचे उत्तर देताना माहितीदार व्यक्तीची कथनशैली सावध स्वरूपाच्या बोलण्याकडून स्थानिक बोलीकडे वळते, असे जवळ जवळ नेहमीच दिसून आले आहे.[३]

अर्थातच अशा उपायांनी शैलीतील टोकाचे बदल हाती लागण्यात नेहमीच यश मिळेल अशी अपेक्षा करता येणार नाही. मुलाखत देणारी व घेणारी व्यक्ती यांच्यात समोरासमोर वाद होण्याऐवजी (क्षमता, पात्रता, वय, पार्श्वभूमी, सामाजिक व आर्थिक दर्जा, इत्यादी बाबतीत) समान पातळीवर असणाऱ्या व्यक्तींमध्ये होणारी साधी नेहमीची चर्चा असे स्वरूप देऊन माहितीदार व्यक्तीच्या बोलण्याचे नियमन करणे, हा त्यापेक्षा अधिक वैध मार्ग ठरतो. गंपर्झ (1964) यांनी सहज बनलेल्या गटागटांशी चर्चा करून तिचे ध्वनिमुद्रण केले आणि त्यातून मूलभूत स्वरूपाची सामग्री मिळविली. दक्षिण-मध्य हार्लेममधील[भा३] आमच्या संशोधनात (Labov et al. 1968) आम्ही समवयस्क कुमारांच्या गटांमध्ये मिसळून दीर्घ काळ निरीक्षण केले. गटांतील सर्व सभासदांच्या एकेकट्याने मुलाखती घेऊन त्यांतून आम्हाला हवी असलेली प्रत्येक व्यक्तीविषयीची वैयक्तिक माहिती मिळविली. गटवार चर्चांची अनेक सत्रे केली आणि गळ्यात अडकवायच्या ध्वनिमुद्रकाच्या साहाय्याने प्रत्येक व्यक्तीचे बोलणे ध्वनिफितीच्या वेगवेगळ्या पट्टिकांवर (ट्रॅक्सवर) मुद्रित केले. या गटवार चर्चांमध्ये उघड स्वरूपाची कोणतीही बंधने नव्हती; कुमारवयीन मुले नेहमी वागतात तशीच बहुतांशी वागली; आणि बहुतेक परस्परप्रक्रिया-शारीरिक तसेच वाचिक-या त्यांच्यात आपापसांतच झाल्या. त्यामुळे पद्धतशीर निरीक्षण चालू आहे असे त्यांना वाटायला कमीत कमी वाव मिळाला.

**झटपट व निनावी पद्धतीच्या मुलाखती :**

आताच वर्णन केलेल्या पद्धतींमध्ये प्रत्येक माहितीदार व्यक्तीचे नाव आणि जनगणनाशास्त्रीय[भा४] स्थान यांची पक्की माहिती उपलब्ध असते. परंतु निनावी पद्धतीने

आणि मुलाखतीचे रूप न येऊ देता लोकांशी संवाद साधूनही पद्धतशीर निरीक्षण करता येते. काही मोक्याच्या जागा हेरून पुष्कळ लोकांचे निरीक्षण थोड्या वेळात करता येते आणि त्यांचे सामाजिक स्थान वस्तुनिष्ठ पद्धतीने ठरवून घेतले तर हाती लागणारी माहिती खूपच महत्त्वाची असू शकते. न्यूयॉर्क शहरातील भाषिक समूहांचा अभ्यास करताना, वेगवेगळ्या सामाजिक स्तरांवरील तीन प्रचंड आकाराच्या वस्तुभांडारात नोकरी करणाऱ्यांच्या मुलाखती झटपट व निनावी पद्धतीने मी घेतल्या आणि त्याअगोदर झालेल्या एका समाजभाषाविषयक पाहणीचे निष्कर्ष पडताळून पाहिले (Labov, 1966 : 63-67). 'फोर्थ फ्लोअर' या शब्दयोजनेत स्वरानंतर येणाऱ्या 'j' या ध्वनीचा उच्चार हा भाषाभेदाचा एकच चलघटक अभ्यासायचा असल्यामुळे मिळालेली माहिती सहज ध्वनिचिन्हांकित करता आली. लोकसमूहाच्या जनगणनाशास्त्रीय वैशिष्ट्यांविषयीची माहिती या संशोधनात अगदी ढोबळ स्वरूपाची होती; परंतु मुलाखतीच्या वेळचे दडपण त्यात अजिबात नव्हते. आपली मुलाखत घेतली जात आहे, आपले निरीक्षण केले जात आहे, किंवा नेहमीच्या साध्या संभाषणापेक्षा वेगळे काही घडते आहे असे माहितीदार व्यक्तींना अजिबात वाटले नाही. त्यानंतर याच नमुन्यानुसार अशा स्वरूपाच्या पाहण्या करण्यात आल्या आहेत आणि विविध सामाजिक स्तरांवरील लोकांना प्रश्न विचारून विविध प्रकारची माहितीसामग्री जमा करण्यात आली आहे.

**निश्चित पद्धती न ठरविता केलेली निरीक्षणे**

या अशा कोणत्याही संशोधनातून स्थानिक बोलीच्या मूलभूत व सुव्यवस्थित स्वरूपासंबंधी काही सामग्री खरोखर मिळाली आहे का, हे तपासून पाहणे आवश्यक आहे. विविध मोक्याच्या ठिकाणी लोकांच्या बोलण्याचे निरीक्षण कोणतीही निश्चित पद्धती न ठरविता व उघडपणे केल्यास आपल्याला वरील बाबतीत किती यश मिळाले आहे, याची कल्पना येऊ शकेल. रेल्वेगाड्या, बस, उपाहारगृहे, तिकिटांसाठीच्या रांगा, प्राणिसंग्रहालये यांसारख्या सार्वजनिक जागी – किंबहुना जेथे एखाद्या भाषिक समूहातील पुरेशी माणसे एकत्र जमली असतील आणि त्यांचे बोलणे नैसर्गिकरीत्या सहजपणे इतरांना ऐकू येत असेल अशा कोणत्याही जागी – पुष्कळ लोकांच्या बोलण्यातील स्थिर व चल स्वरूपाची वैशिष्ट्ये ध्वनिमुद्रित करता येतात. अशा निरीक्षणांमध्ये मुळातच काही घटकांना अतिरिक्त महत्त्व प्राप्त होते. उदाहरणार्थ, कमी शिकलेल्या व मोठ्याने बोलणाऱ्या लोकांवरच येथे प्रामुख्याने लक्ष केंद्रित होते. मात्र औपचारिक मुलाखतीच्या प्रसंगातील कमतरता दूर करण्याचा एक उपाय म्हणून अशा तऱ्हेने मिळवलेली माहिती फार महत्त्वाची ठरू शकते.

## जनसंपर्क माध्यमे

आकाशवाणी व दूरदर्शन यावरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमांतूनही काही पद्धतशीर सामग्री मिळू शकते, मात्र तिच्यात बोलणाऱ्यांची निवड व त्यांची शैली यांवर बहुधा फार बंधने येतात. अलीकडे नैसर्गिक आपत्तींच्या ठिकाणी प्रत्यक्ष घेतल्या गेलेल्या बऱ्याच मुलाखती आपण पाहतो. अशा वेळी बोलणारे लोक हे त्या घटनेच्या तात्कालिक प्रभावाखाली असल्यामुळे आपल्या स्वत:च्या बोलण्याचे नियमन करण्याच्या परिस्थितीत नसतात. एखाद्या सार्वजनिक प्रसंगांतील संभाषणे व भाषणे यांतून समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या बोलण्याचे नमुने मिळतात; परंतु त्यांतील शैली प्रत्यक्ष मुलाखतीत आढळणाऱ्या शैलीपेक्षाही अधिक औपचारिक असते.

## शैलीच्या विस्तारपटाचे औपचारिक टोक

बोलणाऱ्या व्यक्तींच्या औपचारिक भाषिक वापरामध्ये बोलण्याकडे अधिक अवधान दिलेले असते. बोलणाऱ्या व्यक्तीला शैलीच्या एकूण विस्तारपटाच्या या औपचारिक टोकापर्यंत घेऊन जाणे संशोधनात अधिक सोपे असते. बोलणाऱ्या व्यक्तीला अधिक काळजीपूर्वक बोलायला प्रवृत्त करतील अशा तऱ्हेचे बरेच प्रश्न असतात. (उदाहरणार्थ, बोलण्याविषयीचेच प्रश्न). आजपर्यंत शहरी भागांत झालेल्या बहुतेक संशोधनात ध्वनिविषयक बदलांचा अभ्यास करण्यासाठी भाषिक संहिता वाचणे या गोष्टीचा प्रयोग करण्यात आलेला आहे. सर्वसाधारणपणे भाषिक चलघटक हे पुढीलप्रमाणे बदलतात : औपचारिक अशा प्रत्यक्ष माहिती काढण्याच्या प्रक्रियेमध्ये त्यांचे स्वरूप एक असते तर संहितांचे अनौपचारिक वाचन करताना त्यांचे स्वरूप बरेच वेगळे असते. विविध प्रकारच्या भाषिक संहिता वाचताना शैलींच्या विविध तऱ्हा पाहायला मिळतात. सुट्या सुट्या शब्दांची यादी वाचण्याऐवजी स्थानिक बोलीवर किंवा कुमारांच्या जिव्हाळ्याच्या विषयांवर लक्ष केंद्रित करून लिहिलेली व वाचण्यास सोपी, ओघवती अशी एखादी संहिता वाचायला दिली तर बोलण्याची बरीचशी अनौपचारिक शैली दिसून येते. अशा चाचणीत अल्पतम युग्मे सहजच गोवता येतात, त्यामुळे त्यांतील व्यवच्छेदक भेदाची जाणीव वाचणाऱ्या व्यक्तीला होत नाही. अशा अल्पतम युग्मांची वेगळी काढलेली यादी त्या व्यक्तीला वाचायला दिली तर तिच्यातील अभ्यासण्याचा चलघटक व शब्द एकमेकांपासून वेगळे ओळखण्यासाठी करण्यात येणारा त्या चलघटकाचा उपयोग, यांच्याकडे त्या व्यक्तीचे लक्ष मुद्दाम वेधले जाते. नंतर या दोन्ही वेळी त्यांच्या उच्चारणांत होणाऱ्या बदलांची तुलना करता येते. '... I told him to ask a subway guard. My god ! I thought, that's one sure way to get lost in New York City' यासारख्या वाक्यात god-guard या अल्पतम

युग्माचा समावेश करून ही चाचणी घेता येते. नंतर इतर शब्दांच्या एका मोठ्या यादीत god व guard हे शब्द घालता येतात. अखेरीस बोलणाऱ्या व्यक्तीला हे दोनच शब्द उच्चारण्यास सांगून तिला ते सारखेच वाटतात की वेगळे वाटतात हे विचारता येते. अशा तऱ्हेने स्वरानंतर येणाऱ्या 'r' या ध्वनीच्या उच्चाराच्या पाच भिन्न शैली आपल्याला अभ्यासता येतात :

(१) नेहमीचे सर्वसामान्य बोलणे

(२) मुद्दाम काळजीपूर्वक बोलणे

(३) संहितेचे वाचन

(४) शब्दांच्या याद्या

(५) अल्पतम युग्मे.

वाचनाच्या शैलीच्या कक्षा रुंदावण्यासाठी लेविन व क्रॉकेट (1966) तसेच ॲन्शान (1969) यांनी एक वेगळी पद्धती वापरली. भाषेचे चलघटक अंतर्भूत करून काही वाक्ये मुद्दाम तयार केली आणि इतरत्र त्याच वाक्यांमध्ये जागा मोकळ्या सोडून माहितीदार व्यक्तीला वाचता वाचता त्या जागी शब्द घालण्यास सांगितले. अशा तऱ्हेने भाषिक चलघटकांपासून त्याचे लक्ष बाजूला केले. नुसत्या शब्दांची यादी वाचताना ध्वनिबदलाच्या घटकांत जेवढ्या प्रमाणात 'r' या ध्वनीचा उच्चार होतो त्यापेक्षा अशा वेळी तो कमी प्रमाणात होताना दिसला.

बऱ्याचशा औपचारिक चाचण्यांमध्ये माहितीदार व्यक्तीला वाचायला सांगण्याची जरुरी नसते. ए-बी-एक्स् पद्धतीच्या संवेदना-चाचण्यांमधून [भा-५] उपयुक्त माहिती मिळू शकते : एखादा स्वनात्मक भेद जेथे पूर्णपणे लोप पावला आहे तेथे एक्स् हा 'ए' या घटकाला अधिक जवळचा आहे की 'बी' या घटकाला, हे माहितीदार व्यक्तीला वेगळे ऐकू येत नाही; परंतु जेथे रचनात्मक भेदाचे नियम कार्यरत आहेत व ध्वनींमधील भेद पूर्णपणे लोप पावलेला नाही अशा ठिकाणी या प्रयोगाला काही अंशी यश मिळते. शब्दांचे पुनरुच्चारण करण्याच्या चाचण्या दोन ते पाच वर्षांदरम्यानच्या मुलांवर घेतल्या तर व्याकरणासंबंधी आश्चर्यकारक वाटावी अशी माहिती मिळते. परंतु प्रमाणेतर भाषा बोलणाऱ्यांच्या बाबतीत बऱ्याच अधिक वयाच्या म्हणजे १० ते १७ वर्षे वयाच्या माहितीदारांच्या बोलण्यातील अंतर्गत व्याकरणाचे नियम त्यांच्या पुनरुच्चारणाच्या स्वरूपाचे नियमन करतात असे आढळल्याने आम्ही चकित झालो. अप्रमाणित नीग्रो इंग्लिश बोली बोलणाऱ्यांना त्यांच्या स्वत:च्या व्याकरणानुसार असणारी लांब लांब वाक्ये पुन्हा बिनचूक म्हणून दाखविण्यात काही अडचण आली नाही. परंतु प्रमाण इंग्लिशमधील अनेक वाक्ये पुन्हा उच्चारताना ती त्यांच्या स्थानिक बोलीच्या धाटणीने

उच्चारली गेली (Labov et al. 1968:39)[४]

भाषांकडे पाहण्याची समाजाची दृष्टी आणि बोलींच्या रूपाने मिळणारी समाजविषयक माहिती यांना परस्परांपासून वेगळे करण्यासाठी औपचारिक स्वरूपाच्या बऱ्याच चाचण्या विकसित करण्यात आलेल्या आहेत. एखाद्या बोलीचे 'प्रातिनिधिक' रूप वापरणाऱ्यांच्या बोलण्याचे ध्वनिमुद्रित केलेले नमुने चाचणी देणाऱ्या व्यक्तींना ऐकविले जातात. त्यावरून बोलणाऱ्यांची वांशिक पार्श्वभूमी व सामाजिक वर्ग ओळखण्यास त्यांना सांगण्यात येते (Labov et al., 1968:4.4; Brown, 1969). बोलणे ऐकून अशी समाजविषयक माहिती मिळते की नाही हे त्यावरून आपल्या लक्षात येते. परंतु ही माहिती नेमकी कशात दडलेली असते – व्याकरण, स्वनव्यवस्था, सुरातील चढउतार की आवाजाचे गुणधर्म – हे कळू शकत नाही. भाषिक चलघटक आणि वैयक्तिक स्वरूपाची वैशिष्ट्ये यांना वेगळे करण्यासाठी व्यक्तिनिष्ठ पातळीवरील प्रतिक्रिया-चाचण्यांचा-उपयोग होतो. लँबर्ट व त्याच्या शिष्यांनी 'मॅच्ड गाइज' या तंत्राचा वापर केलेला आहे (Lambert, 1968). या तंत्रात एकाच व्यक्तीने बोललेल्या वेगवेगळ्या भाषा वा बोलींचे ध्वनिमद्रित नमुने चाचणी देणाऱ्या व्यक्तींना ऐकविले जातात व त्यावरून त्यांना बोलणाऱ्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाविषयी निष्कर्ष काढण्यास सांगण्यात येते. आधीच्या चाचणीत या बोलणाऱ्या व्यक्तीविषयी आपण काय निष्कर्ष काढले आहेत हे जर चाचणी देणाऱ्यांना माहीत नसेल तर बोलणाऱ्या व्यक्तीचा प्रामाणिकपणा, विश्वासार्हता, बुद्धिमत्ता, इत्यादींविषयी वेगवेगळे निष्कर्ष काढले जातात व त्यातून चाचणी देणाऱ्यांचा भाषाविषयक सामाजिक दृष्टिकोण हा नकळत व्यक्त होत असतो. आम्ही स्वत: केलेल्या व्यक्तिनिष्ठ पातळीवरील प्रतिक्रिया–चाचण्यांमध्ये (Labov, 1966 : 405-50, Labov et.al., 1968 : 4.6) एक बोलणारी व्यक्ती निरनिराळी वाक्ये वाचताना ऐकविण्यात आले; त्या वाक्यांतील फरक मुख्यत्वे ज्या भाषिक चलघटकाचा अभ्यास करायचा आहे त्याच्या हाताळणीमध्ये असतो. चाचणी देणाऱ्या व्यक्ती त्या त्या भाषिक चलघटकाला सामाजिकदृष्ट्या किती महत्त्व देतात हे त्या वाक्यांना दिलेल्या त्यांच्या वेगवेगळ्या प्रतिक्रियांवरून समजते. त्यांना खालीलप्रमाणे प्रश्न विचारले जातात : ''ही बोलणारी व्यक्ती ज्या तऱ्हेने बोलते आहे त्यावरून तिला जास्तीत जास्त किती वरच्या स्तराची नोकरी असू शकेल ?'' किंवा ''ही बोलणारी व्यक्ती रस्त्यावरच्या एखाद्या मारामारीमध्ये वरचढ ठरण्याची शक्यता किती आहे ?''

रूपनिश्चिती झालेल्या भाषिक चलघटकांकडे पाहण्याचा बोलणाऱ्या व्यक्तींचा दृष्टिकोण आत्ममूल्यमापनात्मक चाचण्यांमध्येही दिसून येतो. एखाद्या शब्दाच्या वा

वाक्याच्या विविध रूपांपैकी कोणते रूप तुमच्या बोलण्याचा प्रातिनिधिक नमुना ठरेल, असा प्रश्न चाचणी देणाऱ्यांना विचारला असता ते जे रूप त्यांच्या बोलण्यात वास्तविक येते ते सांगत नाहीत, तर ज्या रूपाला प्रतिष्ठा आहे किंवा जे रूप 'शुद्ध' रूप आहे असे त्यांना वाटते तेच रूप ते सांगतात. येथेही चाचणी देणाऱ्यांच्या बोलण्याची वास्तविक पद्धत माहिती नसेल तर अशा चाचण्यांमधून मिळालेल्या माहितीची नीट संगती लावता येत नाही.

समाजात वापरण्यासाठी शिष्टसंमत नसणाऱ्या भाषाभेदांची बोलणाऱ्यांना किती जाणीव आहे हे शोधण्यासाठी वाक्ये दुरुस्त करण्याच्या *शैक्षणिक पद्धतीच्या चाचण्या* घेता येतात. त्यामध्ये शालेय वा शैक्षणिक पातळीवरील भाषेच्या आदर्श नमुन्यांना सोडून असणारी वाक्ये दुरुस्त करण्यासाठी त्यांना दिली जातात (Labov et.al., 1968: 4.4.). याउलट प्रतिष्ठा पावलेल्या प्रमाणित भाषेतील रूपांचे नमुने चाचणी देणाऱ्या व्यक्तींना देऊन त्यांचे अप्रमाणित अशा स्थानिक बोलीत रूपांतर करून देण्याची चाचणी घेतली जाते; परंतु अशा प्रकारच्या *स्थानिक बोली दुरुस्ती चाचण्यां*मधून अर्थपूर्ण असे निष्कर्ष हाती लागणे अशक्यप्राय असते. औपचारिक चाचणीच्या वातावरणाचा प्रभावच असा असतो की अप्रमाणित बोलीचे नियम चाचणी देणाऱ्या व्यक्तींच्या डोळ्यासमोर बिनचूकपणे येत नाहीत. लहानपणीच्या वापरामध्ये जी अप्रमाणित रूपे तयार होत असतात ती स्वत:चे बोलणे ऐकून त्याचे नियमन करण्याच्या निकषांनी नियंत्रित झालेली असतात; मोठेपणी या निकषांची जागा प्रमाण भाषेच्या निकषांनी घेतली जाते, व त्यामुळे पुन्हा अचूकपणे त्या अप्रमाणित नियमांकडे लक्ष वळविणे चाचणी देणाऱ्या बहुसंख्य व्यक्तींना शक्य होत नाही, असे म्हणण्यास पुरावा उपलब्ध आहे. यावरून स्थानिक बोलीतील बदलांविषयी एक महत्त्वाचे तत्त्व पुढीलप्रमाणे मांडता येते : जेव्हा जेव्हा एखादी दुय्यम बोली प्रमुख बोलीच्या संपर्कात आलेली असते तेव्हा औपचारिक चाचणीमध्ये मिळणारी उत्तरे ही दुय्यम बोलीऐवजी प्रमुख बोलीमध्येच दिली जातात; मात्र त्यात काही विशिष्ट नियम वा पद्धती असल्याचे दिसत नाही. येथे वापरलेल्या 'प्रमुख' व 'दुय्यम' या संज्ञा म्हणजे समाजात प्रतिष्ठेनुसार संज्ञांच्या स्तरांची जी श्रेणिव्यवस्था दिसते तिला अनुलक्षून आहेत. चाचणी देणाऱ्या व्यक्तींना जर संशोधनाच्या हेतूंविषयी 'प्रशिक्षण' दिले तर हा प्रकार बराचसा कमी करता येईल व हळूहळू निखळ स्थानिक बोलीची प्रातिनिधिक अशी उत्तरे आपल्याला मिळू लागतील. अशी आशा काही भाषावैज्ञानिक बाळगतात. परंतु हा निव्वळ भ्रम आहे. उलट प्रतिष्ठित बोलीविषयीच्या ज्ञानाचा उपयोग करून चाचणी देणाऱ्या व्यक्ती प्रतिष्ठित भाषेतल्याप्रमाणेच किंवा त्यासारखी असणारी स्थानिक

व्यक्तींचा उपयोग करतात. अभ्यासायची भाषा कधी कधी त्या माहितीदार व्यक्तींना चांगली बोलताही येत नसते. तरीही औपचारिकदृष्ट्या माहिती काढून घेण्याची ही सुरुवातीची पावले म्हणजे सामाजिक संदर्भाच्या अनुषंगाने भाषेचा अचूक अभ्यास करण्याची पूर्वतयारी म्हणून आवश्यक असतात. त्या पलीकडे जाऊन चांगले भाषावैज्ञानिक वर म्हटल्याप्रमाणे समूहचर्चा तर घडवून आणतातच; शिवाय त्यांच्या बरोबरीने त्या भाषेच्या निजभाषकांचे आपसातील बोलणे ध्वनिमुद्रित करून उत्तम सामग्री जमा करतात. जेव्हा संशोधक व्यक्तीला त्या भाषेची चांगली 'ओळख' होते, म्हणजे त्या भाषेतील जलद संभाषण जेव्हा तिला चांगले समजू शकते, तेव्हाच त्या भाषेचा सामाजिक संदर्भात अभ्यास करता येणे शक्य होते. मानववंशविज्ञानाचे जाणकार असणारे भाषावैज्ञानिक जेव्हा भाषेच्या उच्च स्तरावरील संशोधनापर्यंत पोहोचतात तेव्हा शैलींची प्रतवार विभागणी त्यांना निश्चितपणे करावी लागते आणि तेव्हा बोली-बदलाचे सिद्ध तत्त्व तेथे लागू पडते.

दोन वेगवेगळ्या भाषा बोलणाऱ्या माहितीदार व्यक्तींच्या साथीने काम केल्यानंतर अभ्यासण्याच्या भाषेविषयी काही एक मर्मदृष्टी प्राप्त करता येते हे खरे. परंतु 'दोन बोली' बोलणाऱ्या माहितीदार व्यक्तींच्या बाबतीत असे म्हणता येईल की नाही याबद्दल शंका आहे - तेही मुळात अशा प्रकारचे दोन बोली बोलणारे खरोखरच अस्तित्वात असले तर. प्रमाणेतर बोली बोलणारी व प्रमाण भाषेवर चांगले प्रभुत्व मिळविल्यानंतरही आपल्या प्रमाणेतर स्थानिक बोलीवरील प्रभुत्व टिकवून आहे अशी एकही माहितीदार व्यक्ती आम्हांला आढळली नाही. लहानसहान तडजोडी आणि संदर्भजन्य परिस्थितीचाच थोडासा विस्तार असल्याप्रमाणे भासतील अशा निम्नस्तरातील नियमांवर बोलीबोलीतील फरक अवलंबून असतात. अशा परिस्थितीत त्या नियमांची एकमेकांशी देवाणघेवाण अपरिहार्यपणे होतेच असे दिसते. आणि बोलणारी व्यक्ती खरोखर स्थानिक बोली बोलते आहे असे वाटले तरी तिच्या बोलण्याचे जवळून परीक्षण केल्यास तिच्या बोलीच्या व्याकरणावर प्रमाणभाषेचा खूपच प्रभाव असल्याचे आढळते. ती व्यक्ती स्थानिक बोलीच बोलते आहे अशी ऐकणाऱ्यांची समजूत करून देण्यात ती व्यक्ती कदाचित यशस्वी होईलही; परंतु ती समजूतसुद्धा पद्धतीविरहित आणि ठळक स्वरूपाच्या अनेक वैशिष्ट्यांवर अवलंबून असलेली दिसते.

प्रतिष्ठाप्राप्त प्रमाण बोलीची ज्यांना अधिक जाण आहे आणि त्या जाणकारीच्या बाह्य परिमाणांचा ज्यांच्या भाषिक वर्तनावर अधिक परिणाम झाला आहे असे लोक प्रत्येक भाषिक समाजात असतात. ज्या व्यक्ती अशा प्रमाणभाषेला मानत नाहीत त्यांच्यापेक्षा आधी उल्लेखिलेल्या लोकांच्या बोलण्यात शैलीबदल अधिक मोठ्या

बोलीतील रूपे सांगण्याचे टाळतील आणि साचेबंद स्वरूपाची रूपे सांगतील. त्यामुळे ''अगदीच वेगळ्या स्वरूपाच्या'' किंवा ''चुकीच्या स्वरूपाच्या'' वाक्यांचा संच तयार होईल. प्रतिष्ठित बोलीतील रूपांशी ज्या लोकांचा व्यापक प्रमाणावर संपर्क आला आहे त्यांना त्या शब्दांच्या स्थानिक बोलीतील रूपांविषयी निश्चित अशी जाण नसते.[५]

एखाद्या 'शिक्षित' माहितीदाराकडून अप्रमाण स्थानिक बोलीसंबंधी मिळणाऱ्या माहितीकडे संशयाने पाहण्याचे आणखी एक कारण आहे. मुलाखत घेणारी व्यक्ती ही सामान्यतः प्रमाणित प्रतिष्ठित बोलीत बोलते आणि प्रत्यक्ष मुलाखतीच्या वेळीसुद्धा तीच बोली प्रधान असते. माहितीदार व्यक्तीची भाषा शिकण्याची क्षमता ही सर्वकाळ जागृत असल्यामुळे मुलाखत चालू असताना त्या व्यक्तीचे व्याकरणविषयक नियम हे प्रमाणित भाषेच्या प्रभावाखाली प्रकर्षाने येत असतात, असे म्हणायला पुरावा आहे.[६]

अशा प्रकारच्या 'दुरुस्ती'पासून जवळजवळ अबाधित राहणारी माहितीदार व्यक्ती फारच क्वचित कधीतरी आपल्या समोर येते. या व्यक्तीला प्रमाण बोलीचे ज्ञान असले तरीही स्वतःच्या बोलीविषयीचे सहजज्ञानही तिला असतेच. अशा भाषिक वर्तनाशी संलग्न असणाऱ्या किंवा असे वर्तन घडवून आणणाऱ्या मनोप्रवृत्तींचा छडा लावणे आणि त्यावरून एखाद्या भाषिक समूहातून असे 'आदर्श' माहितीदार निवडून काढणे हे मनोभाषावैज्ञानिकांच्या पुढे एक मोठे काम असते. परंतु तरीही स्थानिक बोलीविषयीच्या इतर माहितीच्या आधाराने माहितीदार व्यक्तीची उत्तरे तपासणे आणि तिच्या मूळ व्याकरणिक नियमांची जाण तिला खरोखरीच आहे का, हे पाहणे आवश्यक असते. ही माहिती पडताळून पाहण्यासाठी त्या बोलीतील अनौपचारिक बोलण्याच्या निरीक्षणाने त्या बोलीचे नियम आपल्याला आधी अवगत करून घ्यावे लागतात. मात्र हा सगळा प्रकार अगदीच वर्तुळात गोल गोल फिरण्यासारखा नाही. बाह्य परिस्थितीपासून अबाधित असणाऱ्या आपल्या माहितीदार व्यक्तीविषयी आपल्याला खात्री असेल तर अनौपचारिक बोलण्यात सापडणे अतिशय दुर्मीळ अशा रूपांविषयी अत्यंत महत्त्वपूर्ण सामग्री आपल्याला तिच्याकडून मिळू शकते. बोलीत न दिसणाऱ्या दुर्मीळ रूपांच्या स्थायीपणाविषयी नेहमी दिसणाऱ्या रूपांच्या स्थायीपणावरून अंदाज करणे कितपत सुरक्षित आहे, या प्रश्नाचे उत्तर सहजी देता येणार नाही.

काही भाषावैज्ञानिक हे ज्या भाषेचा अभ्यास करायचा आहे तिच्या तुलनेने जिला उच्च-नीचतेचे काहीच सामाजिक परिमाण लाभलेले नाही अशा एखाद्या माध्यम भाषेद्वारे त्या भाषेचा अभ्यास करीत असतात. अशा भाषावैज्ञानिकांच्या बाबतीत वर मांडलेले विचार जसेंच्या तसे लागू करता येतीलच असे नाही.[७] एखाद्या भाषेचा प्रथम अभ्यास करताना भाषावैज्ञानिक बऱ्याच वेळा दोन भाषा जाणणाऱ्या माहितीदार

प्रमाणात आढळतात. 'भाषिक असुरक्षिततेची भावना मोजणाऱ्या चाचण्यां'नी अशा प्रवृत्तींचे मापन करता येते. सामाजिक दृष्टीने ठळक दिसणाऱ्या भाषिक चलघटकांची यादी करून त्यांपैकी कोणते रूप बरोबर आहे आणि कोणते रूप ते स्वतः वापरतात असे त्या माहितीदार व्यक्तींना विचारले जाते. या दोन उत्तरांमधील भेदघटकांची संख्या म्हणजे भाषिक असुरक्षिततेचा निर्देशांक होय; म्हणजेच, आपल्या स्वतःच्या बोलण्यापेक्षा भिन्न असा व्याकरणिक शुद्धतेचा बाह्य निकष ती व्यक्ती किती प्रमाणात मानते, हे या निर्देशांकावरून लक्षात येते. (Labov, 1966: 47-80)

(**टीप :** या लेखाचा उत्तरार्ध, त्यावरील टिपा व लेखाची संदर्भसूची पुढील अंकात प्रसिद्ध होईल.)

**टिपा :**

(१) सततच्या निरर्थक आवाजांच्या ( व्हाइट नॉइज् ) साहाय्याने प्रयोग करण्यात आले. त्यावरून असे आढळले की या आवाजांमुळे स्वतःचे बोलणे ऐकता ऐकता त्याचे अशा प्रकारे नियमन करणे अशक्य होते, व त्यामुळे बोलण्याच्या शैलीत बदल होतात. अन्य कारणांमुळे बोलण्याकडे अवधान पुरविण्यात अडथळे आल्यास ज्या प्रकारचे शैली-बदल होतात तशाच प्रकारचे हे शैली-बदल असतात.

(२) उघडपणे ध्वनिमुद्रण करणे कधी कधी शक्य असते व तशी परवानगीही आपल्याला मिळालेली असते. परंतु ध्वनिमुद्रित आवाजाची प्रतच इतक्या कमी दर्जाची असते की अशा ध्वनिमुद्रणाचा उपयोग फार तर आपण जमविलेल्या इतर माहितीसामग्रीच्या पुष्टीकरणापुरता होऊ शकतो.

(३) या प्रश्नासंबंधी मजेची गोष्ट अशी की त्याला 'होय' किंवा 'नाही' अशा स्वरूपाचे उत्तर मिळण्याची शक्यता असते आणि ती आपण शक्यतो टाळली पाहिजे. 'आपण अशा परिस्थितीत सापडलो होतो' हे तर त्या व्यक्तीला कबूल करायचे असते; मात्र त्याविषयी समग्र माहिती आपणहून देण्याची तिची तयारी नसते. परंतु काही क्षण मध्ये जाऊ देऊन 'मग पुढे काय झाले ?' असे जर मुलाखत घेणाऱ्या व्यक्तीने विचारले तर आधी कबूल करून बसल्यामुळे समग्र वृत्तांत सांगण्याचे टाळणे माहितीदार व्यक्तीला फार अवघड जाते. अन्यथा त्या व्यक्तीने खोटाच दावा केला होता असे होईल.

(४) या चाचण्यांनंतरच्या काळात शाळेतील मुलांच्या अधिक मोठ्या प्रमाणावर चाचण्या घेऊन या निरीक्षणांची सत्यासत्यता पडताळून पाहिलेली आहे. मात्र अशा चाचण्यांमध्ये माहितीदार व्यक्तीचा स्थानिक बोलीशी असणारा निश्चित संबंध माहिती नव्हता.

(५) लहान मुलांच्या बाबतीत हे खरे आहे हे स्पष्टच दिसते. लहान मुलांचे एखादे अप्रमाणित बोलीतील वाक्य हे व्याकरणदृष्ट्या सुरचित आहे की नाही असे त्यांना आपण विचारू शकत नाही, त्याचप्रमाणे मोठ्या माणसांना त्यांच्या लहानपणीच्या व्याकरणाची पुनर्रचना करून दाखवायला सांगता येत नाही. जुन्या नियमांशी निकटचा संबंध असणाऱ्या दुसऱ्या नियमांची मालिका शिकल्याने व्याकरणाच्या अगोदरच्या परिस्थितीची पुनर्रचना करणे शक्य नसते, हे सर्वसाधारणपणे खरे आहे.

(६) ज्या अप्रमाणित भाषिक चलघटकांविषयी आम्ही दक्षिण-मध्य हॉर्लेममध्ये संशोधन करीत होतो त्यांच्याविषयी संशोधनाच्या दरम्यान आमचा स्वतःचा क्षेत्रीय निरीक्षक जॉन लूइस याच्या वापरातच बदल झालेला आम्हांला आढळला : त्याची मुलाखत आम्ही १९६५मध्ये घेतली आणि त्यानंतर १९६७पर्यंत त्याने इतरांच्या मुलाखती घेतल्या; त्या दरम्यान त्या अप्रमाणित भाषिक चलघटकांबाबत त्याच्या स्वतःच्या बोलण्यात हा फरक झालेला दिसला.

(७) थायलंड व ब्रह्मदेशात बोलली जाणारी लाहू ही लोलो-ब्रह्मी कुळातील भाषा आहे. तिचा अभ्यास करण्याच्या प्रारंभिक प्रयत्नामध्ये जे. मॅटिसॉफ यांनी इंग्लिश व लाहू अशा दोन्ही भाषा बोलणाऱ्या व्यक्तीचा माहितीदार म्हणून वापर केला. त्यांच्या मते लाहू या भाषेशी अगदी जवळून संबंधित असणाऱ्या थाय भाषेचा उपयोग त्याने केला असता तर मिळालेल्या सामग्रीत खूपच चुका झाल्या असत्या.

## भाषांतरकारांच्या टिपा

भा१. येथे 'बोलणारा' असा पुल्लिंगी प्रयोग केला आहे. परंतु मुळात लबव यांनी 'स्पीकर' हा इंग्लिश शब्द पुल्लिंगी म्हणूनच वापरलेला आहे आणि सर्वत्र he असे पुल्लिंगी सर्वनाम वापरून परिच्छेदाच्या अखेरीस स्पीकरच्या पत्नीचाही उल्लेख केलेला आहे. सध्या लिंगाच्या दृष्टीने तटस्थ शैली वापरण्याचा प्रघात आहे. त्यानुसार त्यांनी he/she तसेच wife ऐवजी spouse असे प्रयोग करायला हवेत; कारण येथे त्यांना कोणतीही मानवी व्यक्ती अभिप्रेत आहे, केवळ पुरुष अभिप्रेत नाही. मराठीमध्ये 'बोलणारी व्यक्ती' असा प्रयोग करणे समर्पक झाले असते. मूळ मजकुराशी इमान राखण्यासाठी भाषांतरामध्ये 'बोलणारा' असा पुल्लिंगी शब्दच राखला आहे.

भा२. येथे मुळात 'ऑब्झर्व्ज पॅरडॉक्स' अशी संज्ञा असली तरी हा विरोधाभास निरीक्षकाचा नसून निरीक्षणप्रक्रियेमधला असल्याने मराठीमध्ये 'निरीक्षणविषयक विरोधाभास' अशी संज्ञा वापरली आहे.

भा३. हार्लेम हा न्यूयॉर्क शहराच्या मॅनहॅटन या विभागातील एक उपविभाग आहे. आफ्रो-अमेरिकन वस्तीचे अमेरिकेतील हे मुख्य केंद्र मानले जाते.

भा४. god व guard या दोन शब्दांचे उच्चार ब्रिटिश इंग्लिशमध्ये गॉड व गाऽड असे भिन्न होतात. अमेरिकन बोलण्यात मात्र त्यांचा उच्चार गाऽड व गाऽर्ड असा होतो. त्यामुळेच लबव यांनी या दोन शब्दांना अल्पतम युग्म म्हटले आहे.

भा५. संवेदना-चाचण्या : या चाचण्यांमध्ये ऐकणाऱ्या व्यक्तीला अ, ब आणि क्ष अशा तीन प्रकारच्या स्रोतांमधून ध्वनी ऐकविले जातात. अ आणि ब हे संदर्भासाठी घेतलेले ध्वनी असतात व त्यांच्यापैकी अ मध्ये खरखर असते तर ब मध्ये नसते. क्ष हा स्रोत अ आहे की ब आहे हे नक्की माहीत नसते. ऐकणाऱ्या व्यक्तीने अ आणि ब यांच्याशी तुलना करून त्याविषयी अंदाज करायचा असतो. ■

मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग,
आय.आय.टी., पवई, मुंबई 400 076
ई-मेल : malshe@hss.iitb.ac.in
milindmalshe@yahoo.com

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- ☐ 'मालविका' - विश्वास वसेकर, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाउस, पुणे. २००७. पृष्ठे ११०. किंमत १००/- रुपये
- ☐ 'भारतीय ध्वनिसिद्धान्त आणि मराठी साहित्य', - डॉ. जयश्री पाटणकर, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २११. किंमत १८०/- रुपये

# मराठी भाषा व संस्कृतीला जपणारी मदुराईची सौराष्ट्री

**माणिक धनपलवार**

मदुराई हे तमिळनाडूतील प्रसिद्ध दैवतक्षेत्र होय. गुजरातमधील सौराष्ट्रातून आलेला फार मोठा समाज येथे स्थायिक झालेला आहे. अनेक वर्षांच्या प्रदीर्घ वास्तव्यामुळे त्यांची स्वत:ची एक बोली सिद्ध झाली आहे. तिला मदुराईची सौराष्ट्री बोली असे म्हटले जाते. जपानी भाषाशास्त्रज्ञ व प्राच्यविद्यापारंगत उकिडा नोटिहिको यांनी 'ओरल लिटरेचर ऑफ सौराष्ट्रन्स' (सौराष्ट्री लोकांचे मौखिक साहित्य) हा ग्रंथ सिद्ध केला आहे. मदुराईतील सौराष्ट्री लोकांच्या अस्तंगत होत चाललेल्या मौखिक साहित्याचे संकलन-संशोधन त्यांनी यात मांडले आहे. हा ग्रंथ आपल्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा आहे. कारण येथील सौराष्ट्री भाषेवर मराठीचा सखोल प्रभाव दिसून येतो. पण असा अभ्यास लेखकाच्या विषय-कक्षेच्या बाहेर असल्यामुळे त्यासंबंधीचे विवेचन यात आले नाही. मराठीचा प्रभाव मात्र लेखक मान्य करतात. प्रस्तुत लेखात या प्रभावाचा विचार करण्याचे योजिले आहे. यासोबतच सौराष्ट्री लोकांचा मराठी संस्कृतीशी, स्थानांतरापूर्वीचा व नंतरचा, जो अनुबंध जडलेला आहे, त्याचाही शक्यतो परामर्श घेतला आहे.

दक्षिणेकडे तमिळनाडूत मराठी वस्तीची जी केंद्रे आहेत, त्यात तंजावर, कुंभकोणम्‌च्या खालोखाल मदुराईचे स्थान आहे. तंजावरच्या मराठी राजांच्या कार्यकालांपासून येथे मराठी भाषकांची वस्ती आहे. येथील मध्यमवर्गीय सुशिक्षित वर्ग विविध खासगी वा शासकीय नोकऱ्यांतून वावरतो. संख्या कमी असली तरी त्यांचे भजनीमंडळ आहे व ते काही सांस्कृतिक कार्यक्रमही राबवितात. आता नव्या पिढीतील अनेक जण नोकरीच्या निमित्ताने परदेशात स्थिर झाले आहेत. या नोकरपेशाच्या वर्गानंतर आणखी एक समाज तेथे वास्तव्य करतो व तो म्हणजे कळसूत्री बाहुल्यांचा खेळ करणारा फिरस्ता समाज. सध्या तो तेथे स्थिर आहे की नाही याची कल्पना नाही. पण त्यांच्या बोलीवर आधारित एक प्रबंध पुणे विद्यापीठास सादर झालेला आहे. (परशुरामन टी. १९८८) यांच्या बोलीत व तंजावरच्या बोलीत बरेच अंतर आहे. हे लोक तंजावरहून खाली उतरले असावेत; पण शक्यता अशीही आहे की, हे



अनुक्रमणिका

तंजावरहून येण्यापेक्षा दक्षिण आंध्रातून आले असावेत. कारण आंध्रात कळसूत्री बाहुल्यांच्या खेळास मराठी कलावंतांनी प्रारंभ केला, असे तेलुगु अभ्यासकांचे मत आहे. बोलीच्या या छोट्या दोन प्रवाहांत आणखी एक सूक्ष्म प्रवाह संमिलित असलेला आढळून येतो व तो तसा स्वतंत्र नसून सौराष्ट्री भाषेच्या रूपात आहे. मराठी शब्दांचे लेणे लेणारी ही सौराष्ट्री भाषा व ती बोलणारे सौराष्ट्री लोक मदुराईस आले, ते तंजावरच्या मराठी शासनकाळाच्या काही वर्षे अगोदर. त्रिवेणी संगमात सरस्वती नदी ही जशी गुप्तरूपात अस्तित्वात आहे. त्याप्रमाणे ही मराठी स्वतंत्र रूपात नसून सौराष्ट्री भाषेच्या माध्यमातून अवतरली आहे.

सौराष्ट्र हा गुजरातचा भाग असून इतर दोन भाग कच्छ व गुजरात म्हणविले जातात. परत गुजरात हे संपूर्ण प्रांताचेही नाव आहे. सौराष्ट्र नामक हा प्रदेश जामनगर, राजकोट आदी सहा जिल्ह्यांत विभागलेला आहे. या सौराष्ट्रावर मराठ्यांनी स्वाऱ्या केल्या. तेथे मराठ्यांची काही काळ सत्ताही होती. इ.स. १७०५ मध्ये कंठाजी कदमबांडे, दमाजी गायकवाड यांनी तेथे मुलुखगिरी केली. इ.स. १७५१ मध्ये तेथे गायकवाडांचा अंमल होता. गायकवाडांचा संबंध सारा वसुलीपुरता असे. तेथील जहागिरदारांनी यांना सारा दिला की काम भागे, व ते जहागीरदार तसे स्वतंत्रच असत. यामुळे मराठी भाषकांची तेथे फारशी वस्ती नसावी. पण गुजरात व महाराष्ट्र यांच्या सीमा परस्परास भिडलेल्या असल्यामुळे इतिहासकाळापासून दोन्हीकडील लोकांची ये-जा चालू आहे. यामुळे गुजराती भाषेवर मराठीचा प्रभाव आहे. अनेक शब्द व शब्दरूपे त्यांनी मराठीतून घेतली व सौराष्ट्र हा गुजरातचा भाग असल्यामुळे त्यांच्या बोलीतही मराठीचा अंतर्भाव असणे स्वाभाविक आहे.

आगमनकाल : आता हे सौराष्ट्री लोक दक्षिणेत मदुराईस कधी आले हा प्रश्न उद्भवतो. मदुराईच्या सौराष्ट्री लोकांची रूढ समजूत अशी - इ.स. १०२४ मध्ये महंमद गझनीने सौराष्ट्रातील सोमनाथ मंदिरावर आक्रमण केले. खूप नासधूस केली. तेथील बरीच संपत्ती लुटून नेली. प्रजेवर अनन्वित जुलूम केला. परिणामतः लोकांना तेथे राहणे असुरक्षित वाटले, व ते मदुराईस येऊन स्थायिक झाले. पण त्यांनी एवढ्या दूर मजल का मारली, मदुराईच आश्रयासाठी का निवडली हा प्रश्न पडतो. शिवाय त्यांच्या मार्गात महाराष्ट्रादी अन्य प्रदेश होते, तेथे ते का स्थिर झाले नाहीत, किंवा गुजरातेतच अन्य सुरक्षित भागात ते का गेले नाहीत, याचे समाधानकारक उत्तर सापडत नाही. यामुळे त्यांच्या स्थलांतराचे हे कारण नसावे, व त्याचा काळही एवढा प्राचीन नसावा. तेलुगु अभ्यासकांच्या मते कृष्णदेवरायाच्या अधिपत्याखालील मदुराईच्या एका तेलुगु नायक राजाने स्वतःच्या राज्यात रेशमी व जरीच्या कापड

उत्पादनाला चालना मिळावी म्हणून त्यांना बोलावून घेतले. हे मत अधिक पटण्याजोगे आहे. कारण मदुराईला आलेले सौराष्ट्री लोक एकजात विणकर आहेत. (पण ते स्वत:ला गौड ब्राह्मण म्हणवून घेतात) मदुराईच्या नायक राजांच्या कार्यकाळास इ.स. १५६१ पासून प्रारंभ होतो. तेथील पहिला सत्ताधारी सेवप्पा नायक होय. तंजावरच्या मराठी राजांचा काल यानंतरचा म्हणजे इ.स. १६७६ पासून पुढे. आजमितीस सौराष्ट्रींच्या आगमनकाळास चारशे वर्षांचा इतिहास आहे. या प्रदीर्घ काळात हा समाज तमिळ लोकांशी एकरूप झाला. त्यांची भाषा व जीवनपद्धती स्वीकारली; पण त्याचबरोबर आपली भाषा व संस्कृतीही टिकवून ठेवली. गुजराती व त्याची पोटभाषा सौराष्ट्री ह्या लोकसाहित्यासाठी प्रारंभापासून प्रसिद्ध आहेत. त्या समाजात परंपरेने चालत आलेली व्रतगीते, विवाहगीते, अंगाईगीते, नीतिवचने व अन्य कथागाथा विपुल प्रमाणात असून त्यांनी त्या भाषेला संपन्नता व एक व्यक्तिविशिष्टता प्राप्त करून दिली आहे. मदुराईला आल्यावर- ते लोक टप्प्याटप्प्याने आले असावेत - त्यांनी हे मौखिक साहित्य बऱ्याच प्रमाणात टिकवून ठेवले; बरेच काही नवे निर्मिलेही. पण काळाच्या ओघात व आधुनिकीकरणामुळे काही रचनांचे स्वरूप बदलले, बऱ्याच रचना विस्मृतीतही गेल्या. पूर्वीपासून चालत आलेले सण, व्रते व अन्य धार्मिक उपचार हळूहळू मावळत चालल्यामुळे त्यांची गीतपरंपराही रोडावत गेली. या मौखिक साहित्यावरच जपानी अभ्यासकाने आपला प्रबंध सिद्ध केला आहे. सौराष्ट्रीवरील मराठीचा प्रभाव शोधण्यापूर्वी त्यांच्या बोलीवर हा प्रभाव कुठे व कसा पडला असेल यासंबंधी थोडा विचार करू.

**महाराष्ट्रात वास्तव्य :** मदुराईस आलेले सौराष्ट्री लोक स्वत:च्या प्रदेशातून सरळ इकडे आलेले नाहीत. हा व्यापारी समाज असल्याने त्यांचा संचार व वास्तव्य विविध प्रांतांत झालेला असणार. मराठीपुरते बोलावयाचे म्हणजे त्यांनी महाराष्ट्रात बराच काळ वास्तव्य केले असावे. त्यामुळे त्यांच्या भाषेत मराठीतील प्राचीन शब्द तसेच ग्रामीण शब्द, शब्दरूपे, वाक्प्रयोग यांचा समावेश आहे. गुजराती भाषेत बरेच मराठी शब्द अस्तित्वात असले तरी मदुराईच्या मराठीतील शब्द वेगळे वाटतात. (पुढे योग्य स्थळी शब्दांची सूची आली आहे.) त्यांचा महाराष्ट्रातील वास्तव्याचा निर्देश एका प्रसंगातून आला आहे. सौराष्ट्रीयांच्या विवाहपद्धतीत वाङ्‌निश्चय करताना वधुवराकडील ज्येष्ठ लोकांना 'बोहल्या'वर स्वत:चे कुलदैवत, गोत्र आदींची माहिती द्यावी लागते व त्याचबरोबर आपली वंशावळ व मदुराईला आगमन होण्यापूर्वीची आपली वास्तव्यस्थाने सांगावी लागतात. यासंबंधात त्यांनी दिलेल्या माहितीनुसार पंढरपूर व देवगिरी या महाराष्ट्रातील स्थानांचा उल्लेख आला आहे. महाराष्ट्रातील अन्य गावेही त्यांच्या

भ्रमणमार्गात असू शकतील; पण एवढ्या मोठ्या कालखंडात सर्वच गावे त्यांच्या स्मृतिकोशात राहिली असतील असे मानणे कठीण आहे. त्यांनी एका मुलाखतीत सांगितले- ''सौराष्ट्र देसु निळिकिनु पांडुरंगनु दर्शनु केर्यासि'' (नोरिहिको १९७९, पृ. ५०) विठ्ठलोपासना सौराष्ट्री समाजात बऱ्याच काळापासून रूढ आहे. त्यांच्या अंगाईगीतात इतर देवांबरोबर विठ्ठलही आला आहे. 'विठला गो निंजि' (हे विठ्ठला तू नीज), असे म्हणून बाळाला संबोधले आहे. विठ्ठलच नव्हे; तर ज्या कारणवश विठ्ठल पंढरपुरी उभा आहे, तो भक्त पुंडरीकही सौराष्ट्री लोकांच्या कीर्तनाचा व भक्तिभावाचा विषय झाला आहे व सौराष्ट्री भाषेतील कीर्तनाख्यानाला आधार आहे महिपतीच्या 'भक्तविजया'चा. 'महाभक्त विजयत्तिल पुंडरीकदास चरितम्' ('विजयत्तिल' म्हणजे 'विजया'तील) असे या आख्यानाचे शीर्षक असून त्याचा रचयिता परूंडान अय्यंगार आहे. ही रचना इ.स. १९२१ साली मदुराईहून प्रसिद्ध झाली. हा लेखक प्रसिद्ध कीर्तनकारही (मृत्यू-१९६८) होता. दक्षिणेत कथाकालक्षेपम् किंवा हरिकथाकालक्षेपम् म्हणजे कीर्तन व भागवतार म्हणजे कीर्तनकार. येथील सौराष्ट्री बहुभाषिक असल्यामुळे कीर्तनकार संस्कृत, तेलुगु व तमिळ पद्यरचना गाऊन दाखवितो व कथेचे निरूपण प्राधान्याने तमिळमध्ये व कधीकधी सौराष्ट्री भाषेतून केले जाते. (नोरिहिको १९७९ : १३१) दक्षिणेकडील सध्याची कीर्तनपद्धती ही खास महाराष्ट्राची देणगी होय, असे प्रख्यात संस्कृत विद्वान व तंजावरच्या साहित्याचे श्रेष्ठ अभ्यासक व्ही. राघवन्‌पासून सर्वच विद्वान मान्य करतात. प्रस्तुत जपानी लेखकानेही महाराष्ट्राचे हे ऋण मान्य केले आहे. विठ्ठलभक्ती व विठ्ठलसंकीर्तन हे मराठी माणसाचे खास जिव्हाळ्याचे विषय सौराष्ट्रींनी स्वीकारले. विठ्ठलोपासनेबरोबर आणखी एक मराठी दैवत सौराष्ट्रींनी आपल्यात सामावून घेतले व ते म्हणजे दत्तात्रेय. विठ्ठलाप्रमाणे त्यांच्या अंगाईगीतांतून दत्तात्रेयही आला आहे. तान्ह्या बाळाला दत्तात्रेय कल्पून झोपविण्यासाठी आई त्याला जोजविते. दत्तात्रेय हा ब्रह्मा, विष्णू व महेश यांचे त्रिमूर्तिरूप होय. हे अंगाईगीत बोसतिरान् हनुमंतय्यार यांच्या संग्रहातील आहे व याचा रचयिता मदुराईचा अलगददास आहे (नोरिहिको १९७९ : २०) (मदुराईपासून जवळच असलेला अलगददेव हा विष्णुरूप मानला जातो.) अंगाईगीतातील दोन पंक्ती अशा आहेत :

सक्ति माय लोटि अनुसूया थोवलसि होटिर
मुक्तिं सेस्ते दत्तात्तिरेय मूर्ति गो निंजि

(दैवी शक्तीचे रूप बाजूस सरून आई अनसूयेने तुला ओटीत घेतले. जगाला अंतिम आनंद देणारा असा तू दत्तात्रेय शांत झोपी जा.) (नोरिहिको १९७९ : २०)

चौदा कडव्यांच्या या रचनेत कवीने अन्य देवांनाही आवाहन केले आहे. विठ्ठल

व दत्तात्रेय हे महाराष्ट्राचे भक्ति-जिव्हाळ्याचे देव असले तरी गुजरातला/सौराष्ट्राला ते नवे नाहीत. प्रसिद्ध विठ्ठलभक्त नरसी मेहता (इ.स. १४१४-१४८०) हा सौराष्ट्रातील होय. तसेच सौराष्ट्रात गिरनार पर्वतावर असलेला दत्तात्रेय याचेही मराठी भाषकांशी व दत्तभक्तांशी खास नाते आहे. निरंजन रघुनाथ, नारायण महाराज जालवणकर या दत्तभक्तांना येथेच दत्तात्रेयाने दर्शन दिले, अशा कथा आहेत. तेव्हा सौराष्ट्रातील विठ्ठलभक्ती व दत्तभक्ती स्थलांतरितांनी मदुराईपर्यंत आणली. व त्यांच्या स्थानांतराच्या काळात महाराष्ट्रातील वास्तव्यामुळे या देवांशी त्यांचे बंध अधिकच घट्ट झाले. आजच्या सौराष्ट्री पिढीनेही गीते व कीर्तनाख्याने रचून या श्रद्धाभावाला पुष्ट केले. तसे पाहिले तर तंजावरला व मदुराईला मराठी भाषक वस्ती आहे. तंजावर, कुंभकोणम् येथे विठ्ठलमंदिरे आहेत. तंजावर परिसरात विठ्ठलभक्तिपर मराठी पदे रचली गेली. तंजावर, मदुराई इत्यादी बऱ्याच ठिकाणी मराठी भजनी मंडळे कार्यरत असून ती तुकारामादि वारकरी संतांचे विठ्ठलभक्तिपर अभंग म्हणतात. मदुराईप्रमाणे सौराष्ट्री लोकांचीही त्या त्या ठिकाणी कमीअधिक वस्ती आहे. तंजावरला दत्तभक्तांचा समाज असून ते लोक प्रतिवर्षी दत्तजयंती साजरी करतात. या सर्व तथ्यांचा विचार करता तंजावर परिसरातील विठ्ठल-दत्तविषयक भक्तिभावनेचे वातावरण सौराष्ट्री लोकांच्या मनोधारणेस पोषकच ठरले असावे. या परिसरातील मराठी भाषेचा सौराष्ट्री भाषेवर प्रभाव पडला, हे पुढे येणाऱ्या शब्दांच्या सूचीवरूनही दृष्टोत्पत्तीस येईल.

सौराष्ट्री लोकांच्या या धार्मिक अंगाबरोबर अन्य काही विधी, पूजाविषय मराठी पद्धतीप्रमाणे आहेत. विवाहप्रथा ही हिंदूपरंपरेप्रमाणेच आहे. मराठीतील 'बोहला' हा विवाहस्थलदर्शक शब्द त्यांनी स्वीकारला आहे. विवाहानंतर नागवेली/नागेलीचा कार्यक्रम असतो. तो मराठवाड्यातील व विदर्भातील काही जातींत रूढ आहे. याचे मूळ तेलुगूत असावे असे वाटते. सौराष्ट्रींनी ही पद्धती कुणाकडून घेतली हे सांगणे कठीण आहे. विवाहानंतर दोन 'हडपी' वराची सोबत करतात. यादवकालीन मराठी काव्यात वधूची सोबत करणारी 'हडपिणी' येते. दोन्हीतील हे साम्य तसे लक्षणीय मानण्यास हरकत नाही.

महाराष्ट्राप्रमाणे सौराष्ट्री लोकात आवळीची पूजा (कार्तिक शुद्ध पौर्णिमा) व आवळीच्या झाडाखाली बसून स्त्रियांनी भोजन करणे या प्रथा रूढ आहेत (नोरोहिको १९७९ : १०३) भोजनोत्तर सायंकाळी सर्वजण घरी परत येतात. पेहरावाविषयी सांगावयाचे म्हणजे मदुराईतील वयोवृद्ध स्त्रिया अद्यापही महाराष्ट्रीय स्त्रियांप्रमाणे नऊ-वारी साडीच परिधान करताना दिसतात. स्त्रियांना नऊवारी साडीच शोभून दिसते, ती त्यांना सौंदर्य, वैभव व शालीनता प्राप्त करून देते असे सौराष्ट्रातील उपदेशपर

गीतांतून आले आहे. (नोरोहिको १९७९ : ३२)

**मदुराईची सौराष्ट्री भाषा आणि मराठी :** सौराष्ट्री भाषेवर मराठीचा प्रभाव असल्याचे स्पष्टपणे जाणवते. लेखकानेही ''त्यांची भाषा गुजरातीशी साम्य ठेवणारी असून ध्वनिव्यवस्थेच्या व शब्दसंग्रहाच्या दृष्टीने ती मराठीने खोलवर प्रभावित आहे.'' (नोरोहिको १९७९ : २) या शब्दांत मराठीचा या भाषेवर परिणाम असल्याचे मान्य केले आहे. पण तसा भाषिक अभ्यास हे लेखकाच्या ग्रंथाचे प्रयोजन नव्हते हे यापूर्वीच उल्लेखिले आहे.

सौराष्ट्री भाषेचा अभ्यास बराच गुंतागुंतीचा आहे. कारण यावर मराठीबरोबर तेलुगु आणि तमिळचा प्रभाव आहे. काही सौराष्ट्री लोकांनी तेलुगूत साहित्यही निर्मिले आहे. वेंकटरमण भागवतार यांची तेलुगु रचना असून तो प्रसिद्ध संगीतज्ज्ञ त्यागराज याचा शिष्य होता. काही सौराष्ट्री लोक तमिळ लेखक म्हणूनही प्रसिद्धीस आले. एम्.व्ही. वेंकटराम हा तमिळमधून लिहिणारा श्रेष्ठ ग्रंथकार मानला जातो. यामुळे तेलुगु, तमिळ, सौराष्ट्री व मराठी या चार भाषांचे थोडेबहुत अध्ययन असल्याशिवाय त्यांच्या भाषेचे सर्वंकष रूप उलगडता येणार नाही. मी केवळ मराठीच्या दिशेने येथे थोडा प्रयत्न करीत आहे. असा प्रयत्न करताना मराठी व्याकरणाचे सर्वच घटक यातून आढळणार नाहीत, हे प्रथमच लक्षात येते. प्रभावित भाषेत प्रभावक भाषेचे काही विशेषच येऊ शकतात. अर्थात हे सर्व संबंधित प्रदेशातील वास्तव्यकाळावर अवलंबून असते. तसेच या भाषेतील व्याकरणविशेषांचा विचार करताना मतभेदालाही वाव असतो. आपण ज्या शब्दांना मराठी वा मराठीतून निष्पन्न झालेले मानू, त्यांची व्युत्पत्ती गुजरातीतूनही दाखविता येऊ शकेल. कारण गुजराती ही मराठीप्रमाणे एक आर्यकुलोद्भव भाषा आहे. या सर्व खाचखळग्यांचा वा मर्यादांचा विचार करूनच येथे माझे अवलोकन मांडीत आहे.

**नाम** - प्रथम नामांविषयी विचार करू. सौराष्ट्रीय पदांत/कथांत खालील मराठी नाम-शब्द आढळून येतात. (आवश्यक तेथे त्यांचे मराठीतील अर्थ दिले आहेत. समानार्थी गुजराती शब्द पुढे चौकटी कंसांत दिले आहेत. त्यावरून दिलेले शब्द मराठीच होत याची खात्री पटावी.) :

अडपि - हडपी. विडे देणारा सेवक. 'हडपी' हा कन्नड शब्द असून त्याचा विडे, सुपारी ठेवण्याची पिशवी हा अर्थ होतो. हा शब्द यादवकालीन मराठीत येतो.

अमटि - 'आमटी' हा खास महाराष्ट्रीय पदार्थ. ग्रंथाचे लेखक यासंबंधी लिहितात- 'भाताबरोबर खाल्ला जाणारा पातळ तिखट पदार्थ' (नोरोहिको १९७९ : १९)

आंबा - [आंबी] कपाट - कवाड, दार [कमाड]

कोवट्‌ - कवीट, एक फळ    गळा - [गळ्]

गोवतु - गवत [घास]    डुक्कर - [भुंड]

डोंगर - [डुंगर]    डोस्क - डोके [माथु]

तोणु - 'तोंड'पासून निष्पन्न [टुंड]

दल्ला - दादला, नवरा. तंजावर-मराठी तसेच आरे मराठीत रूढ

दिन्नवारू - सणासुदीचे दिवस या अर्थाने (नोरोहिको १९७९ : ११२).
मराठीत दिवसवार हा लक्षणेने श्राद्धाच्या संदर्भातही येतो.

नारेळ - नारळ [नारिया]    नोवरा - नवरा - प्राचीन शब्द

नोवरी - नवरी - प्राचीन शब्द    पाय - [पाव]

बैल्लु - बाईल. बायको या अर्थी तंजावरी मराठीत रूढ

भोवला - बोहला    भांगु - भांग, केसातील [सेती, सेंथी]

मांजीरि - मांजरी [बिलाडी]

मायि - माय, आई. 'मायि बापु' असा जोडशब्द यांत आला आहे.

रानु - रान, अरण्य

रिनु - ऋण. ग्रामीण मराठी तसेच यादवकालीन मराठी यांत रूढ.

रेगत/रगत - रक्त - ग्रामीण मराठीत 'रगत'

वटवागुळ - वटवाघुळ [चामकीडी]. 'पोपट' या अर्थाने या शब्दाचा (चुकीने) वापर
झालेला आहे.

वाट - रस्ता    विस्तवु - विस्तव

विंचु - [वींछी]

सवली - सोवळे. 'मंगल सवली' असे ग्रंथात आले आहे. तेलुगु, कन्नड आदि
दाक्षिणात्य भाषांत यास 'मडि' म्हणतात.

सेज्ज - शेजारी. मराठी स्त्रीगीतात 'शेजी' हा शब्द नेहमी येतो.

हात - [हाथ]

हीरू - विहीर, ग्रामीण मराठीतील शब्द [कुवा]

होटि - ओटी, ओटीत घेणे, या संदर्भात. खास मराठी शब्द

होराडु - 'वऱ्हाड' म्हणजे लग्न. तंजावरी व आरे मराठीमध्ये वराड, वोराडु या
रूपांत येतो.

<u>सर्वनाम</u> - प्रथम पुरुषी 'मी' हे सर्वनाम सर्वत्र येते. गुजरातीतील 'हुँ' कुठेच येत
नाही. 'आम्ही'साठी 'अमि' तर 'तुम्ही'साठी 'तुमि' येते. गुजरातीत
यासाठी 'अमे', 'तमे' येतात. पण येथील ही रूपे मराठीपासून निष्पन्न

झालेली आहेत. कारण यात गुजरातीतील 'ए'कार न येता, मराठीतील 'इ'कार येतो.

<u>दर्शक सर्वनाम</u> - 'त्ये' (लोक) हे मराठीप्रमाणेच आहे. सध्या प्रमाण मराठीत आपण 'ते' लिहितो.

<u>संबंधी</u> - कोनु (कोण), कोने (कोणता). मराठीत 'कोणे एके काळी' असे म्हटले जाते. कोन्नी (कुणाला या अर्थाने)

<u>प्रश्नार्थक</u> - 'कायि' (काय) गुजरातीत 'शुं' येतो. 'काय मारे !' अशी शब्दयोजना यात आली आहे.

विशेषण - इतके, तितके, कितके. कितके म्हणजे 'किती'. कितके रुपये म्हणजे किती रुपये. हा शब्दप्रयोग मराठवाड्याच्या नांदेड जिल्ह्यात रूढ. चौक्कट-चौखट. हा शब्द आरे मराठी व तंजावरी मराठी यांत येतो.

<u>संख्याविशेषण</u> - विसु (-वीस) [वीश], पोंचिसु (=पंचवीस) [पच्चीस], पोन्नासु (=पन्नास) [पचास]

<u>क्रियापदे/कृदन्ते</u> - सौराष्ट्रीत पुढील क्रियावाचक शब्द येतात. अनेक ठिकाणी मराठी व गुजराती शब्द सारखे वाटतात. पण ती क्रियापदे व कृदन्तरूपे मराठीपासून निष्पन्न झालेली आहेत हे सहज कळून येण्यासारखे आहे. ही कृदन्तरूपे सौराष्ट्रीत काही ठिकाणी मराठीप्रमाणे उपयोगात येत असली तरी अनेक ठिकाणी त्यांचा भिन्न रीतीने उपयोगही झालेला आहे. बऱ्याच रूपांच्या उपयोजनेत लवचिकतेचा आढळ होतो. काही रूपे मराठीत येत नाहीत; पण ती मूळ मराठी धातूपासून वा क्रियापदापासून निष्पन्न झालेली आहेत. तुलनेसाठी गुजराती समानार्थक शब्द आवश्यक त्या ठिकाणी चौकटीकंसात दिले आहेत, तर त्यांचा प्रचलित मराठीतील अर्थ साध्या कंसांत दिला आहे.

ऐकणें - ऐक, ऐक्यासि (ऐकण्याने), ऐकेत (ऐकले), ऐकीली, ऐकिसि

करणें - करतो, करत्ते/(करते), कराले (केले), करियासि (करण्यास) 'करतो-करतो' अशी पुनरुक्त रूपेही आली आहेत. [करवूँ]

कळणें - कळाना (कळत नाही). [कळवुँ]

काढणें - खाडतो (काढतो), हेडत्ते या रूपातही. [काढवुँ]

घालणें - घल्लि (घाली), घलत्ते (घालते), घल्यास (घालायास). [घालवुँ]

ठेवणें - थेवि (ठेवतो), थेवलि (ठेवली), थेवलिस (ठेवलीस)

धाडणें - धाड्डवो (धाडतो)

धुणें - धोवलि (धुतली)

निजणें - निंजि (नीज). 'निंजि' हे रूप मदुराईच्या एका मराठी बोलीतही येते. पहा - तनो जाडाच्या हल्लं निंजतो (परशुरामन टी. १९८८, पृ. १८७) (तो झाडाच्या खाली निजतो). [निजवूँ]

पाठ करणें - मुखोद्‌गत करणे. (हे क्रियापद या अर्थाने कुठल्याही दाक्षिणात्य भाषेत येत नाही. तेलुगूत यास 'कंठस्थ करणे' असे म्हणतात)

पिळणें - 'पिळे दुत' म्हणजे पिळलेले दूध (धारोष्ण दूध या अर्थाने)

पुसणें - पुसिलेतु, पुसिलेतिसे होतेसि (विचारीत होतो), पुसेस (पुसेल). [पूछवूँ]

बुडणें - बुडे (बुडते) 'दिवस बुडाला', सूर्य मावळला या अर्थी.

बोलावणें - बोवत्ते (बोलाविते)

भरणें - भोरत्ते (भरते). [भरवूँ]

मिचकावणें - मिस्कि. [मीचवूँ]

मेनेति - (म्हणते)

राहणें - ऱ्हायि (रहा), ऱ्हाना (रहाना) ऱ्हातो (राहतो), ऱ्हाते (रहाते), ऱ्हावो (राहो), ऱ्हाड (राहू), ऱ्हाडनि. [रहेवूँ]

लावणें - लवि, लवते, लवतेस, लविसि. [लाववूँ]

वावरते - वारते (वारा घालते)

शिंजे - (शिजे). [सिंजवूँ]

सांगणें - सांगिसि (सांगसी) संगन (सांगेन), संगुवो (सांगा)

सोडणें - सोड्वि (सोडून). [छोडवूँ]

होय - होय, होयि (होईल), होवेसि (होतो) होवु, होवे.

<u>अकरण रूपे</u> - सुकन्ना (सुकत नाही). [सुकावूँ] जळना (जळत नाही) बिज्जण्णा (भिजना, भिजत नाही), घालनास्ता (न घालता). जानपद मराठी भाषेत कळंना (कळत नाही), जाईना (जात नाही) येईना (येत नाही) अशी रूपे प्रचलित आहेत. अशीच रूपे सौराष्ट्री भाषेत आली आहेत.

<u>क्रियाविशेषणे</u> - 'समोर' याचे सोम्मरि, सोम्मर, सोमरू अशी रूपे आढळतात. येटु (येथे), तेटु (तेथे), कोटं (कोठे), वोल्ले (वर), खल्लि (खाली), इक्केडि (इकडे). तेलुगूत 'इक्कडा' हा शब्द असून तो याच अर्थाचा आहे. थोवल (तोवर), लगुट्ट (लगत), अत्तो (आता) इत्यादी. 'समोर' याचे आरे मराठीत 'सोंबरू' असे रूप होते.

<u>शब्दयोगी</u> - संगट, संगे (पतिसंगे) जोवळ (जवळ). कोनाकिजवळ, कोनकोजवळ ही दोन्ही रूपे 'कोणाजवळ' याच अर्थाने आली आहेत.

केवलप्रयोगी - अरे बा ! गो, 'अरं बा' असा प्रयोग मदुराईच्या एका बोलीतही येतो.
(धनपलवार, १९९७ : १९२)

ग्रामीण मराठी शब्द - दल्ला (दाल्ला), रेगत किंवा रगत, डोस्कं (डोके) हिरू, माप, रिनु (ऋण), सेज्जा, होराडु, चोक्कट, कितके, ऱ्हा. तसेच वर आलेली बरीचशी अकरण रूपे सौराष्ट्री बोलीत येतात. या व्यतिरिक्त 'दिस ऱ्हातं' (दिवस असताना), 'दिस बुडे' (सूर्य मावळला) आदि खास ग्रामीण मराठमोळे शब्दसंकेतही या बोलीत येतात. 'पिळे दुत' हा शब्दप्रयोग धारोष्ण दुधाकरिता येतो. यात 'सोळफारु' हा एक अप्रचलित शब्द आला आहे. त्याचा 'अर्ली मॉर्निंग' असा अर्थ ग्रंथकाराने दिला आहे. तो कसा आला ते पाहू. 'सोळफारु' या शब्दाची उकल पुढीलप्रमाणे -
सकाळ > सोक्काळ > सोळ.   प्रहर > पार, फार > फारु

शब्दाच्या आद्याक्षराचा ओकार करण्याची प्रवृत्ती दाक्षिणात्यात तसेच गुजरातीत दिसून येते. 'समोर'चे 'सोम्मरि' झाल्याचे आपण पाहिले आहे. यामुळे 'सकाळ'चे 'सोकाळ' हे रूप होणे स्वाभाविक आहे. तसेच यातला मधला वर्ण 'क' गळाला. मधला उच्चार गाळण्याची प्रवृत्ती आरे मराठी व तंजावरी मराठी यातही दिसून येते. उदा० भरडणे > भरणं, पहाटे > पाटे, लहान > लान इ०  'प्रहर'चा पार, फार ग्रामीण मराठीत होतो. सकाळच्या पारी, सांच्यापारी वा-फारी ही रूपे रूढ आहेत. या फारीचे तेलुगूच्या प्रभावाने 'फारु' झाले. सौराष्ट्रांतील अनेक 'उ'कारान्त रूपे ही तेलुगु भाषेच्या प्रभावाची द्योतक आहेत.

सौराष्ट्रांतील काही वाक्ये मराठीला किती जवळ आहेत हे खालील उदाहरणांवरून दिसून येईल. डावीकडील वाक्ये सौराष्ट्री बोलीतील असून उजवीकडे त्यांचा मराठीत अर्थ दिला आहे.

-नोवारि नोवराकु बोवत्ते - नवरी नवऱ्याला बोलावते.
-अपुलं कुलदेव वेंकटेसुक - आपला कुलदेव वेंकटेश्वर.
-हलतु वाटि तोणु धोवली - वाटलेल्या हळदीने तोंड धुतले.
-द्रिष्टि हेडत्ते - दृष्ट काढते. (तमिळच्या प्रभावाने 'क' या कंठ्य उच्चाराचे त्याच वर्गातील 'ह' या उच्चारात रूपांतर होऊ शकते.)
-होटि भोरत्ते - ओटी भरते.
-वंकुटो भांग नोक्को - वाकडा भांग (पाडू) नको.

-बोट्टु लावते - कुंकू लावते. ('बोट्टु' हा शब्द तेलुगु असून मराठवाडा - तेलंगण सीमेवर तो सर्रास वापरला जातो.)

-जानकी, तू बोट्टु कोनकी लाविंतिरिस -'जानकी तू कुंकू कोणकडकी लावलीस', या अर्थाने. 'कोणकडकी' म्हणजे 'वेडेवाकडे', 'कसे तरीच' हा अर्थ. 'कोणकडकी' हा शब्दप्रयोग मराठवाडी ग्रामीण भागात रूढ आहे. 'कोणकडकी' याचे 'कोनकी' असे रूप झाले.

-अम्बो, मी कायि संगन जीसि ? - आई, मी (माझे दु:ख) जशी काय सांगेन(च), म्हणजे सांगणार नाही.

-भक्ति मेनेत कायो मेनि कोन्नी कळाना - भक्ती म्हणजे काय हे कोणालाही कळत नाही.

-ते रुक्मिणीसे डोळो मिस्कि बोवेसि हा रे ? - त्या रुक्मिणीस डोळे मिचकावून (तू) बोलावलेस काय ?

-हानू रट्टा ? - रट्टा मारू ?

-चौक्कट मट्टि लावि - चांगली माती लाव. मट्टि हा तेलुगु शब्द. तो हिंदी भाषेतही आहे.

चुल्ला वोल्ले भातु सिज्जे - चुलीवर भात शिजत आहे.
चुल्ला वोल्ले अमटि तप - चुलीवर आमटी तापत आहे.
दिसऱ्हात दिवो लावि - (श्रीदेवी) दिवस असताना दिवा लावते.
पाइ पोडइ श्रीदेवि - नंतर ती देवाच्या पाया पडते.
(उपरोक्त दोन चरणांतून मराठीतील स्त्री-ओवीची झाक दिसून येते)
पतिस आयुस वृद्धि होनु - पतीचे आयुष्य वाढावे म्हणून.
प्रतिदिन हलत लावले तोणुक - प्रतिदिन हळद तोंडास लावली.
ऐके गीता सुलोकि एक - गीतेचा एक श्लोक ऐक.

''नैनं छिन्दन्ति शस्त्राणि'' : या श्लोकाचा अर्थ :

कुटको करना येको ऐदुन
विस्तवूं जळना कै येको
पानि बिज्जण्ण कै किंचित
वारो सुक्कण्णा कै येको (नोरिहिको १९७९ : ९७)

यातील कुटका, विस्तव ही नामे मराठी होत. करना (कर+ना)

जळना (जळ+ना), बिज्जण्णा (भिज+ना), सुक्कण्णा (सुक+ना) ही मराठीतील क्रियापदाची अकरण रूपे (नकारार्थी) होत. अशी नकारार्थी रूपे गुजरातीत होत नाहीत. 'ऐदुन' हे 'आयुध'चे सौराष्ट्री रूप आहे. (केवळ वानगीदाखल येथे हे स्पष्टीकरण दिले आहे.)

सौराष्ट्री बोलीतील मराठी सहभागाचा विचार-लेख येथे संपला. तो परिपूर्ण आहे असे नाही. लेख संपला तरी यासंबंधीचा विचार येथे संपत नाही. हा अभ्यास अधिक व्यापक व सूक्ष्म स्वरूपात व्हावयास हवा. मौखिक साहित्याबरोबर त्यांच्या लिखित साहित्याचाही यात समावेश व्हावा, तरच मराठी भाषेचे त्यात गुंतलेले धागेदोरे अधिक स्पष्ट होतील व दाक्षिणात्य प्रभावाचे स्वरूपही चांगल्या प्रकाशात येईल.

या लेखातील गुजराती शब्दांसाठी कृ.पां. कुलकर्णी यांचा 'मराठी व्युत्पत्ति कोश' आधारासाठी घेतला आहे. तसेच गुजराती भाषेवरील एका पुस्तकाचाही मला बराच उपयोग झाला. हे पुस्तक प्रा. मृणालिनी शहा, पुणे यांनी तातडीने उपलब्ध करून दिले, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडे. 'भारतीय संस्कृति कोशा'च्या काही खंडांतील (१,४,६,१०) माहितीही मला लाभदायक ठरली. शेवटी ज्या पुस्तकाने या लेखाला मूळ सौराष्ट्रीतील लोकसाहित्याची सामग्री (ध्वनिचिन्हांचा वापर करून) पुरविली, त्याचे लेखक उचिडा नोरिहिको हे देखील धन्यवादास पात्र आहेत. त्यांनी जमविलेली लोकगीते ही कालांतराने विस्मृतीत गेली असती. मौखिक साहित्यावर आधारित इंग्रजीतील हा एकमेव ग्रंथ असावा असे वाटते. त्यांनी लोकसाहित्यच केवळ उपलब्ध करून दिले नाही तर त्याचा परिश्रमपूर्व सिद्ध केलेला अनुवादही दिला आहे. यामुळे माझे लेखकार्य बरेच सुकर झाले. मी १९७१ ते २००० या कालखंडात चार वेळा मदुराईला जाऊन आलो. सौराष्ट्री लोकांशी प्रदीर्घपणे बोलण्याचे, संवाद करण्याचे अनेक प्रसंग आले. आम्ही हिंदीतून बोलत असलो तरी कुठे तरी मराठी प्रभाव जाणवत होता. पण त्या वेळी फारशा गांभीर्याने मी त्याकडे पाहिले नाही. मराठीतून शुद्ध व अस्खलित बोलणारी मंडळीही आढळून आली. व्यापाराच्या निमित्ताने त्यांचा मुंबईशी सतत संपर्क येतो.

मराठी भाषा सूक्ष्मपणे का होईना, दक्षिणेपर्यंत पोचविण्यास सौराष्ट्रीने अप्रत्यक्षपणे हातभार लावला, असे म्हणण्यास हरकत नाही. हे सौराष्ट्री लोक मदुराईस जसे आहेत, तसेच ते तमिळनाडूतील अन्य भागातही विखुरलेले आहेत. १९६१च्या जनगणनेप्रमाणे त्यांची मदुराईतील संख्या ८० हजार होती. ती आता, साडेचार दशकांनंतर, काही लाखांच्या घरात गेली आहे. कर्नाटकातील बंगलोर व आंध्रातील तिरुपती येथेही त्यांची वस्ती आहे. दाक्षिणात्य प्रभावाखाली राहूनही त्यांनी आपली

भाषा व संस्कृती टिकवून ठेवली आहे. सौराष्ट्री लोकांना आपल्या भाषेचा रास्त अभिमान आहे. आपला 'बाषाभिमान' टिकवून ठेवावा असे आवाहन एका प्रसिद्ध सौराष्ट्री लेखकाने आपल्या ज्ञातिबांधवांना केले आहे (नोरोहिको १९७९ : ३५) ही निश्चितच लक्षात घेण्यासारखी बाब होय. सौराष्ट्रीसोबत तमिळ साहित्यक्षेत्रात व दाक्षिणात्य संगीताच्या क्षेत्रातही त्यांनी आपल्या कर्तृत्वाने मोलाची भर घातली आहे. सौराष्ट्री आणि तमिळ येथे हातात हात घालून नांदतात. भाषा व संस्कृतीचे हे संगमस्थान अभ्यासकांना बरेच काही देऊन जाते, आणखी बरेच काही देऊ शकते. दक्षिणेकडील मराठी बोलींच्या तुलनात्मक अध्ययनाला सौराष्ट्री बोली ही निश्चितच साहाय्यभूत ठरणारी आहे.

**संदर्भ :**


धनपलवार, माणिक. १९९७. दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध. राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.

धनपलवार, माणिक. २००७. '' 'आरे भाषा निघंटुवु' : एक परिचय'', 'भाषा आणि जीवन' उन्हाळा : पृष्ठे २६-३४. पुणे.

नोरिहिको. १९७९. ओरल लिटरेचर ऑफ सौराष्ट्रन्स. सीमान्त पब्लिकेशन्स, कलकत्ता.

परशुरामन्. टी. १९८८. मराठी डायलेक्ट ऑफ तमिळनाडू पपेट आर्टिस्ट्स. पीएच.डी. प्रबंध, पुणे विद्यापीठ. ■



3-4-1013/19 बरकतपुरा, हैदराबाद 500027 दूरध्वनी 040-27561284


सरकारी शाळांचे दुष्टचक्र असे आहे की समाजातील उच्चभ्रूंची मुले इंग्रजी माध्यमात, खासगी मराठी शाळेत आणि गरिबांची मुले सरकारी शाळेत असे चित्र निर्माण झाले आहे. त्यामुळे एक प्रकारची सामाजिक विषमताच शाळांमधून पुढे सरकत असल्याचे निरीक्षण NCERTचे प्रमुख कृष्णकुमार मांडतात.

कृष्ण आणि सुदामा एकाच शाळेत शिकले. त्यामुळे सुदामा समोर येताच कृष्णाला सुदाम्याची वेदना समजली. आज कृष्ण पब्लिक स्कूलमध्ये शिकतो आहे आणि सुदामा नगरपालिका शाळेत !

हेरंब कुलकर्णी
'महाराष्ट्रातील प्राथमिक शिक्षण : एक सामाजिक प्रश्न'

# शिक्षणाची भाषा आणि भाषेचे शिक्षण

**रमेश पानसे**

दोन किंवा अधिक भाषा सहजतेने वापरता येणे ही आजच्या आणि उद्याच्या पिढीची गरज आहे. वेगाने होणाऱ्या जागतिकीकरणाच्या काळात आणि त्याकरवी अनेक भाषिक संस्कृती जवळ येण्याच्या घटनेमुळे अनेक भाषकांची सरमिसळ होणे अपरिहार्य आहे. साहजिकच अनेक भाषा संपर्कभाषा म्हणून भारतात विकसित व्हायला हव्यात. आपल्या समाजापुरते बोलायचे झाले तर मुलांना मराठी आणि इंग्रजी अशा दोन्ही भाषा यायला हव्यात. तसेच भाषा आत्मसात करणे, मोठ्या वयापेक्षा लहान वयात अधिक वेगाने नि विनासायास होत असते; हे ध्यानात घेऊन तसे प्रयत्न लहान वयातच होणे अधिक श्रेयस्कर असते. मात्र हे लक्षात घेणे आवश्यक आहे की भाषा 'आत्मसात होणे' आणि भाषा 'शिकणे' या दोन्ही भिन्न स्वरूपाच्या प्रक्रिया आहेत. आपली पहिली भाषा ही आत्मसात केलेली भाषा असते. मुलांच्या अगदी लहान वयात, नजीकच्या प्रौढांकडून आणि त्यांच्या व्यावहारिक बोलण्यात जी भाषा असते ती, मुले नैसर्गिकरीत्या आत्मसात करीत असतात. ही भाषा श्वासोच्छ्वासाइतकी सहजतेने आत्मसात होत असते. मुलांच्या नजीकच्या वातावरणात जर एकापेक्षा अधिक, म्हणजे समजा, दोन भाषा असतील, त्या तेवढ्यात प्रमाणात प्रभावी असतील, तर मुले दोन्ही भाषा तेवढ्याच सहजतेने आत्मसात करतात. इतकेच नव्हे, तर त्यांचा व्यवहारात वापर करताना, त्या त्या भाषेच्या व्याकरणाचे नियम पाळून स्वतंत्रपणे त्या त्या भाषेत बोलू शकतात. घरातच आईची पहिली भाषा वेगळी आणि वडिलांची पहिली भाषा वेगळी असेल आणि दोन्ही भाषांचा सर्रास वापर घरात होत असेल तर मुले दोन्ही भाषा आत्मसात तर करतातच; पण गल्लत न करता त्यांचा वापर करू शकतात. आईशी आईच्या भाषेत तर वडिलांशी वडिलांच्या भाषेत बोलू शकतात. असे गरजेनुसार भाषिक वर्गीकरण करण्याची क्षमता मुलांमध्ये उपजतच असते.

ज्यांची पहिली भाषा मराठी आहे (किंवा तत्सम कुठलीतरी प्रादेशिक भाषा आहे) त्यांनी इंग्रजी शिकण्यासाठी किंवा (त्यासाठी) इंग्रजीतून शिकण्यासाठी केवळ सर्वतोपरी इंग्रजीवरच भर दिला; इंग्रजी यावे यासाठी मराठी भाषेचा वापरच टाळण्याचा

प्रयत्न केला किंवा मराठी ही दुय्यम, कमी प्रतीची भाषा आहे असे मुलांच्या मनावर ठसवले तर त्यांची आपली पहिली भाषा बोलण्याची क्षमताच हळूहळू कमजोर होऊ लागते. बहुतेक इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधून असेच घडते आहे असा माझा कयास आहे. भाषा म्हणून ठसविलेले भाषेचे दुय्यमत्व तुच्छतेच्या स्तरावर जाण्याची शक्यता लहान वयात अधिक असते; कारण यावर विचार करून कृती करण्याचे ते वय नसते. (असा अनुभव मी स्वत:च एका प्रथितयश इंग्रजी माध्यमाच्या शाळेतील बालवर्गात घेतला आहे. टिचर (!) वर्गात 'गुड आणि बॅड' अशा गोष्टींची यादी मुलांकडून वदवून घेत होत्या. उदाहरणार्थ, सकाळी तोंड धुणे ? ..........गुड ! दुसऱ्याला मारणे ?....... बॅड ! इत्यादी. याच मालिकेत त्या बाईंनी शिकविले, मराठीतून बोलणे ?....बॅड ! आणि इंग्रजीतून बोलणे ?... गुड !) त्याचबरोबर अधिक मोठा धोका असतो तो त्यांचे त्यांच्या मराठी भाषिक कुटुंबीयांशी किंवा नजीकच्या मराठी भाषिक कुटुंबांशी असलेले संबंध दुरावतात. कारण भाषा हे संबंध बांधण्याचे आणि संबंध टिकविण्याचे प्रभावी साधन असते. त्याहून मोठा तोटा असा की त्यांचे स्वत:चेच एक काल्पनिक असे इंग्लिश भाषिक विश्व तयार होते. त्यात त्यांच्या काही मोजक्या मित्रांशिवाय आणि परस्परांतील बहुधा शालेय जगाच्या संदर्भातील विनिमयाखेरीज अन्य काही असत नाही. साहजिकच आजूबाजूच्या वातावरणातील नजीकच्या भाषिक संस्कृतीतील संबंधांना ते पारखे होतात. एकूण अनुभवविश्व मर्यादित राहण्याचे, वास्तव सांस्कृतिक अनुभवविश्व मर्यादित राहण्याचे परिणाम हे एकूणच शिकण्याच्या बौद्धिक नि भावनिक क्षमतांना मारक ठरतात. वास्तविक पाहता, मराठी (माध्यम) विरुद्ध इंग्रजी (माध्यम) असा सामना रंगविण्याचे काही कारण नाही. मराठी आणि इंग्रजी अशा दोन्हीही भाषा अस्खलितपणे येणे, हे कोणतीही एकच भाषा उत्तम येण्यापेक्षा अधिक चांगले आहे. आणि जर शास्त्रीय अंगाने पाहिले तर ते शक्यही आहे.

परंतु आज शाळांमधून ज्या पद्धतीने इंग्रजी भाषा शिकविली जाते, त्या पद्धतीने हे साध्य होणार नाही. आज शाळांमधून चाललेले मुलांचे इंग्रजी शिकणे हे 'शिकविण्याकरवी शिकणे' या पद्धतीत मोडणारे आहे. या पद्धतीने कोणत्याच विषयाचे शिक्षण नीट होत नाही हा आपला सामान्यत: अनुभव आहे. भाषा हीही त्याला अपवाद नाही. त्यामुळे एकूणच शिक्षणव्यवस्थेत 'शिकविण्या'पेक्षा 'शिकण्या'वर लक्ष केंद्रित केले, शिक्षककेंद्री वर्गशिक्षणाच्या जागी विद्यार्थीकेंद्री शिक्षणाला जागा करून दिली तर सर्वच विषयांचे शिक्षण चांगले होईल; अर्थात भाषेचेही. आज शाळा-कॉलेजांमधून होणाऱ्या इंग्रजी भाषेच्या शिक्षणाबाबत एक वेगळीच पण मोठी अडचण आहे. आपल्या मुलांना एक भाषा म्हणून इंग्रजी शिकवायची आहे; पण आपण ती



अनुक्रमणिका

एक विषय म्हणून शिकवतो आहोत. जसा इतिहास, भूगोल, गणित किंवा शास्त्र तसा इंग्रजी हा एक विषय मानून त्यासाठी इतर विषयांप्रमाणेच ठरावीक तासिका ठेवून आणि इतर विषयांप्रमाणेच क्रमिक पुस्तकातून, त्यातील प्रश्नोत्तरे तयार करून मुले भाषा शिकू पाहताहेत. यात फार मोठी विसंगती आहे. इतर विषयांमधून मुलांना काही 'आशय' शिकायचा असतो. तसा भाषेच्या शिक्षणाच्या बाबतीत म्हणजे मराठी व इंग्रजी-हिंदी भाषांच्या बाबतीत क्रमिक धड्यांमधील 'आशय' शिकणे प्राधान्याचे नसते तर ती 'भाषा' शिकायची असते. आणि लहान वयातील भाषा शिकणे हे 'शिकणे' नव्हे; तर भाषा 'आत्मसात' करणे असावे लागते. भाषा आपसूक आत्मसात होत असते. ती विचारपूर्वक व्याकरण शिकवून येणारी गोष्ट नसते तर ती सहजतेने, ऐकलेल्या शब्दांच्या अर्थात्मकतेचा शोध घेत घेत सरावाची होत असते. भाषा ही, वातावरणात पसरलेली असेल तर ती नैसर्गिकरीत्या सतत ऐकून नि बोलूनच आपलीशी होत असते. अशा वातावरणनिर्मितीने पहिल्या भाषेइतक्याच सहजतेने दुसरी भाषाही आत्मसात होऊ शकते.

परंतु शाळांमध्ये इतर विषयांप्रमाणेच एक विषय म्हणून भाषा शिकविण्याचा घाट घातला तर क्रमिक पुस्तकांमधील धड्यांवरील उत्तरे पाठ होतील, परीक्षांमधून लिहिता येतील, त्याने परीक्षेत चांगले गुणही मिळतील; पण या साऱ्या जंजाळात भाषा येणे राहूनच जाते. भाषा येणे याचा अर्थ भाषा सहजतेने बोलता येणे आणि ऐकलेली भाषा नेमकेपणाने समजणे होय. लिहिण्या-वाचण्यातही याच दोन प्रक्रिया अभिप्रेत असतात. भाषेकरवी बोली-अभिव्यक्ती येत असेल तर लेखी अभिव्यक्तीही फारशी कठीण नाही. आणि ऐकलेली भाषा समजत असेल तर वाचून समजणेही काही अवघड नाही.

यातील लिहिण्या-वाचण्याची कौशल्ये जरा वरच्या स्तरावरची कौशल्ये आहेत इतकेच. भाषा ऐकण्या-बोलण्याचा सराव असेल तर वाचणे लिहिणे ही कौशल्ये आली की भाषेची सारी कार्ये करण्याची क्षमता येते. परंतु भाषा लिहायला शिकवून, वाचायला शिकवून आणि भाषेचे व्याकरण समजावून देऊन भाषा शिकायला लावणे, यात वेळेचा फार मोठा अपव्यय आहे. आधी भाषा ऐकून समजणे, मग बोलून ती सरावाची होणे हीच भाषा आत्मसात करण्याची एकमेव निसर्गदत्त अशी पद्धत आहे. ज्या वयात पहिली भाषा मुले आत्मसात करतात, त्याच वयात दुसरी भाषाही जर ती पहिल्या भाषेसारखीच आणि पहिल्या भाषेइतकीच व्यवहारातून-वातावरणांतून आली तर तीही पहिल्या भाषेइतकीच प्रभावीपणे येऊ शकते. मुलांना एकाच वेळी, एका पद्धतीने दोन्ही भाषा येऊ शकतात. ■

एच 20, पिनाक मेमरीज, फेज 2, कोथरूड, पुणे 411038.

# ‘आर्यभगिनी’तील पत्रव्यवहार

स्वाती कर्वे

ज्ञानदान आणि वैचारिक उद्‌बोधनाचे उद्दिष्ट समोर ठेवून एकोणिसाव्या शतकात मराठी वृत्तपत्रसृष्टीची सुरुवात झाली. बदलता काळ व घडणाऱ्या घटनांनुसार सामाजिक जीवनातील परिवर्तनाने आकार घेण्याच्या काळात ‘स्त्री’ हा सांस्कृतिक जीवनाचा केंद्रबिंदू बनल्याने ‘स्त्री-जीवनविषयक’ नव्याने विचार करण्याचे भान येत होते; स्त्री-शिक्षणाचे महत्त्व पटत होते. तसेच ‘स्त्री’ संदर्भात सामाजिक सुधारणांची निकड जाणवून त्या दिशेनेही सामाजिक कार्याचा आरंभ होत होता. जनमानसास जागृत करून वैचारिक उद्‌बोधनास हातभार लावणारे, समाजात वैचारिक अभिसरण घडविणारे, समाजाभिमुख नियतकालिक हे माध्यम स्त्रियांच्या उद्धारासाठी व सर्वांगीण प्रगतीसाठी सुद्धा उपयोगी पडणार आहे, या जाणिवेने खास स्त्रियांसाठी नियतकालिक प्रसिद्ध करण्याची प्रेरणा काळानेच तत्कालीन विचारवंतांना दिली. त्यानुसार स्त्रियांसाठी काही नियतकालिके प्रसिद्ध होण्यास सुरुवात झाली. ‘सुमित्र’ (१८५५), ‘स्त्री भूषण’ (१८६४), ‘अबला मित्र’ (१८७६), ‘स्त्री शिक्षण चंद्रिका (१८९९), गृहिणी (१८८७), ही नियतकालिके स्त्रियांसाठी प्रसिद्ध होऊ लागली. ही सर्व नियतकालिके पुरुष संपादित करीत होते; कारण स्त्रियांनी नुकतीच शिक्षण घेण्यास सुरुवात केली होती. स्त्रियांनी लेखन सुरू करण्यासाठी काही काळ जाणे आवश्यक होते. सर्वसाधारणपणे १८८० नंतर स्त्रियांचे लेखन नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागले. तत्पूर्वी स्त्रियांचे लेखन अतिशय क्वचित प्रसिद्ध झालेले दिसते.

इ.स. १८८० ते १९०० हा वीस वर्षांचा टप्पा स्त्रियांच्या प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. शिक्षण, लेखन, सामाजिक, सांस्कृतिक कार्य, संस्थात्मक कार्य, इ० ठिकाणी स्त्रियांचा मर्यादित प्रमाणात का होईना वावर याच काळात सुरू झाला. याच टप्प्यावर १८८६ मध्ये प्रथम आनंदीबाई लाड यांनी ‘आर्यभगिनी’ हे स्त्रियांसाठी नियतकलिक प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला. श्रीमती राधाबाई आत्माराम सगुण यांच्या सहकार्याने आनंदीबाईंनी संपादनाचा प्रयत्न केला. परंतु दाते नियतकालिक सूचीतील नोंदीनुसार बहुधा ‘आर्यभगिनी’चा एकच अंक प्रकाशित झाला. त्यानंतर तीन वर्षांनी

१८८९ मध्ये दुभाषी आणि कंपनीच्या सहकार्याने माणकबाई लाड यांनी 'आर्यभगिनी' संपादित करण्यास सुरुवात केली.

'' 'आर्यभगिनी' : स्त्रियांकरिता उपयुक्त मासिक पुस्तक : लिहिणार : माणकबाई लाड'' अशी नोंद प्रथम अंकावर मिळते. डिसेंबर १८८९ ते डिसेंबर १८९३ अशी चार वर्षे माणकबाई लाड यांनी 'आर्यभगिनी'चे संपादन करून साक्षेपी प्रगल्भ संपादनाचा एक आदर्श एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला निर्माण केला. असे आज 'आर्यभगिनी'चे अंक अभ्यासल्यावर म्हणता येते.

स्त्रियांसाठी प्रसिद्ध होणाऱ्या नियतकालिकांचे नमुने माणकबाईंसमोर होते. त्यांना ज्ञानदान व वैचारिक उद्‌बोधन या उद्दिष्टांची जाणीवही असणार. परंतु एवढ्यावर त्यांनी संपादनाची जबाबदारी सांभाळली नव्हती. एकोणिसाव्या शतकाचा अखेरचा टप्पा स्त्रियांच्या प्रगतीच्या दृष्टीने कसा आहे; सामाजिक परिस्थिती कशी आहे; कोणत्या प्रकारच्या मार्गदर्शनाची स्त्रियांना नेमकी गरज आहे, याविषयी नेमके भान संपादक म्हणून माणकबाईंना होते.

स्त्रियांच्या शिक्षणप्रसाराला वेग येत होता तरीही विरोधाची धारही अद्याप तीव्र होती. स्त्रियांविषयीच्या पारंपरिक विचारांचे धागे समाजमनाभोवती घट्ट होते. तसेच स्त्रियांच्या मनाभोवती सुद्धा होते. पारंपरिक गृहजीवनाची घडी मोडेल, या भीतीने समाज स्त्रियांना शिक्षण देण्यास, मोकळीक देण्यास कचरत होता. त्या वेळेला स्त्रिया शिक्षण घेण्यास सार्वजनिक जीवनात सहभागी होण्यास हळूहळू पुढे येत होत्या. दीर्घकाळच्या बंदिस्त जीवनातून बाहेर पडण्यास स्त्रिया उत्सुक होत्या. प्रकाशाची वाट दिसू लागल्याने स्त्रियांना नवीन उमेद आली होती. या टप्प्यावर स्त्रियांचे मानस घडविताना एकाच वेळी एकमेकांना पूरक, समांतर स्वरूपात प्रयत्न आवश्यक आहेत; स्त्रियांच्या वैचारिक उद्‌बोधनाबरोबर स्त्रियांमध्ये धीटपणा येणे गरजेचे आहे; आपले विचार आपल्या शब्दांत व्यक्त करण्याचा आत्मविश्वास स्त्रियांमध्ये आला पाहिजे; त्यासाठी स्त्रियांची भाषिक तयारी होणे गरजेचे आहे; आणि ती तयारी वेगवेगळ्या भाषिक उपक्रमांतूनच होणार आहे, या विषयीचे भान माणकबाईंना नेमके होते. मर्यादित पृष्ठांच्या नियतकालिकांची त्या दृष्टीने आखणी करण्यात माणकबाई लाड यांनी दाखवलेले संपादकीय कौशल्य वाखाणण्यासारखे आहे.

संपादक म्हणून माणकबाईंचे कार्य आणखी एका बाबतीत नजरेत भरते; ते म्हणजे 'पत्रव्यवहार' ! पत्रव्यवहाराचे महत्त्व त्यांनी पूर्णपणे ओळखले होते. 'पत्रव्यवहार' ही स्त्री-मनाची गाठ मोकळी होण्याची जागा आहे. सर्वसामान्य स्त्रीमनातील सल, व्यथा, तक्रारी, विचार पत्रव्यवहारातून व्यक्त होतील, एकमेकींना

एकमेकींचे विचार समजावून घेता येतील, विचारांचे अभिसरण होऊन स्त्रियांचा बौद्धिक, वैचारिक तसेच भावनिक विकास होईल; हे माणकबाईंनी ओळखले होते. म्हणूनच केवळ ३६ पृष्ठांच्या नियतकालिकात पत्रव्यवहार पोचपावत्या, अभिप्राय यांना भरपूर जागा होती. संपादकीयातून पत्रांसाठी आवाहन केले जाई. महत्त्वाच्या पत्रांना संपादकीय टिपणाची जोडही दिली जाई. 'आर्यभगिनी'चे वितरणही दूरवर पोचलेले असावे. पुणे-मुंबईच्या बरोबरीने बडोदा, सुरत, कारवार, गोवा, जळगाव, फोंडा, इत्यादी दूरच्या गावांतूनही स्त्रिया 'आर्यभगिनी'कडे प्रतिक्रिया, पत्रे पाठवीत होत्या.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या टप्प्याचा विचार करता 'आर्यभगिनी'कडे येणारा पत्रव्यवहार महत्त्वाचा, संख्येने विपुल आणि वैविध्यपूर्ण आहे. तो बोलका, सामाजिक तसेच स्त्रीमनाची स्थितिगती स्पष्ट करणारा आहे. त्यातून स्त्रियांच्या मनावर असणारी सामाजिक, कौटुंबिक दडपणे, स्त्रियांना सतत नवऱ्याच्या नावाने धाक घालून त्यांची उमेद खच्ची करण्याचे प्रयत्न कळतात. 'एक स्त्रियांचा कळवळा बाळगणारी वाचक' गोवा-फोंडा-भोम येथून लिहिते, ''या प्रांतातील एखाद्या स्त्रीने जर एखादे पुस्तक हाती घेतले तर वृद्ध बायकांनी तिला धमकी देऊन ''बाळे, स्त्रियांनी कधीच शिकू नये; कारण ज्या मानाने शिक्षण वाढत जाते त्या मानाने शिकत असलेल्या स्त्रीच्या भ्रताराचे आयुष्य कमी होत जाते,'' असे सांगण्याचा या प्रांतात परिपाठ होता आणि त्यामुळे तिचे हाती पुस्तक घेण्याचे अगदी बंद होत होते.'' या दडपणाखाली असणाऱ्या स्त्रिया एकमेकींना मासिक वाचण्यास देत. त्यांना आत्मविश्वास येत होता. शिकणाऱ्या स्त्रियांची 'युरोपियन लेडी' म्हणून हेटाळणी करणाऱ्या समाजाला विरोध करण्यास स्त्रियांनी एकत्र आले पाहिजे, असा सूरही क्वचित व्यक्त होत होता. तर विधवा स्त्रीची होणारी कोंडी, केशवपनाची भीती, त्यासारखे उद्‌भवणारे प्रसंग सांगतानाच सातारहून पत्र लिहिणारी वाचक 'पुनर्विवाह करण्याची इच्छाही' मोकळेपणाने व्यक्त करताना दिसते. माणकबाईंसारखी एक स्त्री संपादनाचे मौलिक काम करीत आहे. याविषयी तत्कालीन स्त्रियांच्या मनात अनेक संमिश्र भावना होत्या. कौतुक, आदर, कृतज्ञता, अभिमान, कार्याविषयीच्या 'आर्यभगिनी' विषयीच्या सदिच्छा इत्यादी सर्व भावना स्त्रियांच्या पत्रांतून व्यक्त होतात. विविध दिशांनी आकार घेणारी स्त्रियांची भावस्थिती त्यांच्या छोट्यामोठ्या पत्रांतून व्यक्त होते. पत्रांबरोबर पदे, दिंडी, साक्या, श्लोक, गीत इ० काव्यप्रकारांतूनही स्त्रिया आपली कृतज्ञता व्यक्त करीत. 'आर्यभगिनी'ने तीन वर्षे पूर्ण केली तेव्हा तीन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या लेखांच्या सूचीबरोबर संपूर्ण अंक स्त्रियांच्या प्रतिक्रिया-पत्रांचा विशेषांकच दिसतो.

'आर्यभगिनी'तील पत्रव्यवहार स्त्रियांची भाषिक प्रगती, लेखनक्षमता, शैली

समजावून घेण्याच्या दृष्टीनेही महत्त्वाचा ठरतो. स्त्रियांची भाषिक क्षमता, अल्पावधीत स्त्रियांनी केलेली प्रगती त्यांच्या अन्य लेखनाबरोबर पत्रांतूनही सुस्पष्ट होते. लेख लिहिणाऱ्या स्त्रिया शिक्षण घेणाऱ्या असतील. काही प्रमाणात असाव्यात; परंतु पत्रव्यवहार हा सर्वसामान्य वाचकांकडून आल्याने एकंदर तत्कालीन स्त्रियांची भाषा त्यातून प्रकट होते.

पत्रव्यवहार वाचताना स्त्रियांच्या लेखनाची अनेक वैशिष्ट्ये स्पष्टपणे कळून येतात. सर्वात महत्त्वाचे म्हणजे या लेखनामागे आत्मप्रेरणा व मन:पूर्वकता असल्याने उत्कट लेखनाचा स्पर्श सर्व पत्रांना लाभला आहे. त्यात भाषाशैलीच्या अनेक छटा दिसतात. आडगावातून, दूरवरून आलेल्या पत्रांची भाषा घरगुती वळणाची, बोलण्याप्रमाणे लिहिलेली आहे. बोलीभाषा आणि लेखनाची ग्रांथिक भाषा या दोन्हीतील फरकाचे भान आणि आकलन तेव्हा स्त्रियांना असणे शक्य नव्हते. त्यामुळे बरीच पत्रे स्त्रीच्या घरगुती भाषेची छटा व्यक्त करतात. मुलींना शाळेत जाण्याची संधी मिळाली तरी विवाहानंतर स्त्रीचे शिक्षण बंद पडत असे. त्याविषयी पत्र लिहिताना शेवटी पत्रलेखिका लिहिते, ''प्रभुजवळ माझे करद्वय जोडून एवढेच मागणे आहे की, त्याने त्या मुलींना धड वाचता लिहिता व साधारण हिशेब करिता येईपर्यंत शाळेतून न काढण्याविषयी त्यांच्या वडिलांना बुद्धी द्यावी.''

काही पत्रांच्या लेखनातील सफाई विशेषत्वाने जाणवते. विचारांची सुस्पष्टता, मुद्देसूदपणा, नेमकी भाषा, वाक्यरचनेचा डौल हे विशेष कळून येतात. नुकत्याच लेखन करण्यास शिकलेल्या स्त्रियांनी ही पत्रे लिहिली आहेत, यावर विश्वास बसणार नाही इतक्या आत्मविश्वासाने लिहिलेली पत्रे काही कमी नाहीत. साताऱ्याहून पत्र लिहिणारी 'एक विधवा मुलगी,' ''आर्यभगिनी'विषयी माझे विचार'' कळविणाऱ्या लानीबाई शामराव व्यवहारकर, माजाळी कारवारहून पत्र लिहिणारी 'एक कुलवधू' यांची पत्रे काळाचा विचार करता स्त्रियांनी भाषिक प्रगती किती उत्तम केली होती, याचा प्रत्यय देतात.

काही पत्रे संमिश्र शैलीत दिसतात. मधेच घरगुती वळणाची छटा उमटताना दिसते. स्त्रियांची भाषा तयार होत होती, त्याचेच हे लक्षण मानता येते. विषयानुसारही भाषेचा पोत बदलताना दिसतो. विषय घरगुती, तक्रारस्वरूपी असेल तर घरगुती वळणाची, स्वाभाविक बोलीभाषा दिसते. स्त्रियांचे शिक्षण, सामाजिक प्रश्न या विषयी पत्र असेल तर ग्रांथिक भाषा दिसते.

काही शब्द लिहिण्याची पद्धतही वेगळी दिसून येते. ती पद्धत तेव्हा स्त्रियांच्या अन्य लेखनातही दिसून येते. 'म्हणून', 'म्हणजे', 'आम्हां' हे शब्द 'ह्मणून'

'आह्मां', 'ह्मणजे', 'ह्मणा' - याप्रमाणे लिहिलेले दिसतात. त्याप्रमाणे जड, पुस्तकी शब्द वारंवार जाणीवपूर्वक योजलेले दिसतात. असे शब्द वापरले की आपले लेखन उत्तम होते. असा समजही लेखनास नुकतीच सुरुवात झाल्याने स्त्रियांच्या मनात असावा. 'जगन्नियंता', 'करद्वय', 'उन्नत्यर्थ', 'स्त्री शिक्षण उत्तेजनार्थ,' 'स्त्री शिक्षणोत्कर्ष', 'जगदिश्वर', 'महदाश्वर्य', 'स्त्रीशिक्षणेच्छु' यांसारखे शब्द साध्या, सोप्या भाषेतही डोकावतात.

स्त्रियांनी दिंड्या, साक्या, इत्यादी रूपांत पाठविलेली पत्रे म्हणजे स्त्रियांच्या काव्यरचनेचा वेगळा आविष्कार वाटतो. स्त्रिया घरगुती समारंभात स्त्री-गीते, ओव्या, डोहाळे, पाळणे उत्स्फूर्तपणे रचित. स्त्रियांचे कवित्वाचे गुण त्यातून व्यक्त होत. स्त्रियांच्या स्फुट कविताही नियतकालिकांतून प्रसिद्ध होत. त्याच पारंपरिक धर्तीवर स्त्रिया पत्रेही काव्यातून पाठवीत. आज या रचना बाळबोध वाटतील. चरणांच्या रचनेत शाब्दिक ओढाताणही प्रसंगी दिसेल. परंतु १९०० पूर्वीचा काळ आणि स्त्रियांची काव्यातून विचार व्यक्त करण्याची धडपड विचारात घेता या रचना कौतुकास्पद वाटतात. उदाहरणार्थ, चाळीसगावहून गंगूबाई शिंदे यांनी पाठविलेले पद :

पद ('काय मला भूल पडली' या चालीला)
किती तरी संतोष मी, सुखद वाटला ॥ध्रु.॥
त्वन्नाम किती श्रेष्ठ 'आर्यभगिनी' म्हणोनी ॥
तृषित मजलागि करी, अमृत पाजुनी ॥
त्वगुण लिहिण्यास मम, धजे न लेखणी ॥
ईश्वरा चिरायु सतत ठेविला तिला.

(आर्यभगिनी : नोव्हें. १८९०)

गंगूबाई धुरंधर लिहितात :

पद (कृत कृत ह्याचा)
धन्य धन्य मी अजि जहालें ।
माणकबाईसम रत्न लाधलें ।
मासिक पुस्तक वृक्ष लाविला ।
सकळ भगिनींना सुखद जहाला ।
स्त्रि शिक्षण उत्तेजन आलें ।
आर्यभगिनीने धैर्य ही केले ।

(आर्यभगिनी : एप्रिल १८९२)

'वाचकांची पत्रे' ही थोडक्यात विचार व्यक्त करून लिहिण्याची पद्धत त्या काळात रुजली नव्हती. त्या काळातील पत्रे सविस्तर, विस्तृत क्वचित निबंधवजाही असत. क्वचित त्रोटकही असत. विस्तृत पत्रांपासून त्रोटक पत्रांपर्यंत सर्व प्रकारची पत्रे लिहिण्याची क्षमता स्त्रियांनी प्राप्त केली होती. काव्यरूपी पत्रे ही स्त्रियांची भाषिक क्षमता सिद्ध करणारी विशेष खासियत होती.

स्त्रियांची भाषिक प्रगती व्हावी, त्यांचे शब्दज्ञान वाढावे म्हणून माणकबाई लाड, 'आर्यभगिनी'च्या प्रत्येक अंकात वेगवेगळी 'भाषिक कोडी', 'कूट प्रश्न' प्रसिद्ध करीत. येणारा प्रतिसाद प्रसिद्ध करीत. उत्तम उत्तराला बक्षीस देत. या प्रयत्नांना स्त्रियांकडून प्रतिसाद मिळत असे. स्त्रियांनी इतकी प्रगती केली की वाचक-स्त्रिया 'कूटप्रश्न' तयार करून पाठवू लागल्या.

यशवंतबाई रामराव संजगिरी यांनी पाठवलेला 'कूटप्रश्न' बघण्यासारखा आहे.

॥ अद्याक्षरा रहित तो गिरिजेस भर्ता ।
॥ मध्यक्षरा रहित तो गिरिवास कर्ता ।
॥ अंत्याक्षरा रहित तो सुखज्ञान हर्ता ।
॥ सर्वाक्षरा सहित तो सुखसौख्य कर्ता ।

(आर्यभगिनी : जून १८९०)

स्त्रियांच्या एकंदर प्रगतीने १९व्या शतकाच्या अखेरीला स्वतःची दिशा शोधली होती. बाह्य वास्तवाशी स्त्रियांचा संपर्क येण्याची सुरुवात होत होती. अधिक प्रगतीच्या दिशेने वळण घेण्याच्या टप्प्यावर स्त्रियांची भाषिक तयारी कशी होती, त्यांच्या संमिश्र जीवनाप्रमाणेच त्यांच्या भाषिक क्षमतेची सुद्धा संमिश्र स्थितिगती कशी होती, हेच 'आर्यभगिनी'च्या पत्रव्यवहारातून दिसून येते.

भाषा आणि जीवन यांचे नाते अत्यंत निकटचे व संवेदनक्षम असते. 'भाषा' जीवनाच्या प्रगततेचे, विकासाचे, सुसंस्कृततेचे प्रतीक असते. जीवनाच्या विकासाबरोबर भाषेचा विकास होतो. भाषिक क्षमता विकसित होत अभिव्यक्तीचे, भाषिक आविष्काराचे सामर्थ्य वाढत असते. अनेकविध लेखन प्रकारांतून ते आविष्कृत होत असते. म्हणूनच कोणत्याही काळातील साहित्य त्या काळातील जीवनस्थितीचा आरसा असतो. आज 'आर्यभगिनी'चा पत्रव्यवहार म्हणूनच महत्त्वाचा व संग्राह्य वाटतो.

■

5th Avenye ब्लॉक.नं. 203, शेठ उत्तमचंद गांधी मार्ग, कोथरूड, पुणे 38.
दूरध्वनी : 24308135 भ्रमणध्वनी : 9970174630

# आजच्या मराठीचे स्वगत

शुभानन गांगल

कागद-पेन-पेन्सिलीपेक्षा संगणकाचा उपयोग संवाद, व्यवहार, कार्यक्रम, चर्चा अशा भाषेच्या सर्व माध्यमांत अधिक व्यापकतेने होऊ लागला आहे. कागदाच्या पानांपेक्षा संगणकातल्या फायलींची पाने प्रचंड वेगाने वाढत आहेत. महाराष्ट्रात संगणक लोकांपर्यंत पोचले पण ''मराठीचा संगणकीय सहजसुलभ सहभाग शक्य झालेला नाही.'' कागद सहजतेने उपलब्ध होतो आणि त्यावर पेनाने मराठीतून अर्थनिर्मिती करता येते. आता संगणक उपलब्ध आहेत; पण त्यातल्या विविध रचनांतून मराठीत अर्थनिर्मिती साधण्याची सोय सामान्यांपर्यंत पोचली नाही. आजपर्यंत अक्षरांना कागदी वस्तूमानाचे रूप होते. संगणकाने अक्षरांना विश्वसंचार करणे शक्य होईल अशा ऊर्जेचे रूप दिले आहे. आता शब्दांनी कागदावर स्थितप्रज्ञ राहण्याचे सोडून संगणकाच्या माध्यमातून यंत्रांना आज्ञा देण्याचे काम सुरू केले आहे. जर भाषेला संगणकीय रचनांचा अनुभव घेता आला नाही तर ती भाषा नजीकच्या काळात मागासलेली ठरू लागेल.

संगणकाची निर्मिती आणि विकास इंग्रजी भाषेतून झाला. मराठी भाषा संगणकातून इंग्रजीपेक्षा अधिक गोष्टी साध्य करू शकेल; कारण मराठी भाषा ध्वनीवर आधारलेली आणि सर्वसमावेशक आहे. ''मराठी-संगणकीय-तंत्रज्ञान विकसित करणे, लोकाभिमुख असल्याची खात्री करणे, लोकांना ते विनासायास उपलब्ध होणे'' यासाठी विविध संस्थांनी संगणक-तज्ज्ञांनी, सरकारी खात्यांनी, सामाजिक संस्थांनी, राजकीय पक्षांनी, सामाजिक संघटनांनी एकत्र येण्याची गरज आहे.

आजची मराठी भाषा शुद्धलेखनाच्या अवाजवी फापटपसाऱ्यात अडकलेली आहे. ''अर्थ-निर्मितीच्या गरजा आणि निसर्गाने मानवाला दिलेली मेंदूतील भाषा केंद्रे यावर मराठी-लेखन-नियम, तसेच व्याकरण यांची नव्याने बांधणी करणे'' गरजेचे आहे. मनामनातले मराठी, मराठीचे मी-पण टिकवून आहे. मराठीचे मौखिक-सार्वभौमत्व अलौकिक आहे. मराठी ही स्वतंत्र भाषा आहे. ती कोणत्याही भाषेवर अवलंबून नाही. संस्कृत भाषा हीसुद्धा इंग्रजी-बंगाली-तमिळ-गुजराती यांसारखी भिन्न भाषा आहे.

कोणतेही परभाषिक शब्द आणि उच्चार सामावून घेण्याची अद्वितीय ताकद भारतीय भाषांपैकी केवळ मराठीत सर्वात अधिक आहे. या सुप्त ताकदीचा वापर करून घेण्याची वेळ आली आहे.

अजूनही ज्या व्यक्तींना मराठीतल्या तत्सम (संस्कृतमधून आलेल्या) शब्दांचे काय करावे असा प्रश्न पडत असेल त्यांनी ''ते सर्व शब्द एकत्र करून, आपल्या देव्हाऱ्यात ठेवून, त्यांची पूजा करावी'', असेच सांगावे लागेल ! मराठीत आलेल्या कोणत्याही भाषेतल्या शब्दांना मराठीने मराठीसाठी मराठीपणातून मराठी पद्धतीनेच वापरले पाहिजे. खरे म्हणजे महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात हेच घडत आहे; पण त्याची तक्रार ''लोक नियम पाळत नाहीत'' अशी होते. आता लोकांनीच हे नियम मराठीला बाधक आहेत असे सांगण्याची वेळ आली आहे. बदलू म्हणून भाषा बदलत नाही. आजची भाषा नक्की आहे कशी यावर भाषेचे नियम ठरतात; ते लोकांवर लादता येत नाहीत. संस्कृत भाषेची वेगळी चूल मराठीत स्थापन करण्याचे स्वातंत्र्य व्याकरणकारांनी उपभोगले, मराठीवर लादले आणि सर्वसामान्यांच्या मनामनातल्या मराठीने ते त्याज्य ठरविले ! नियमांची पुस्तके निर्माण करूनही ते लोकाभिमुख झाले नाहीत याचा दोष सरकारला आणि शालेय शिक्षणपद्धतीला देण्याचे थांबवा. नियम पाळणाऱ्यांपेक्षा नियम न पाळणारे कितीतरी पटीने अधिक आहेत, म्हणजे नियमांतच दोष आहेत, हे व्याकरणकारांच्या कधी लक्षात येणार ? मराठीला शुद्धलेखनाच्या नियमांची गरज नाही. नियमांची क्लिष्टता नसलेल्या मराठी लेखनाच्या मार्गदर्शक सूचनांची गरज आहे. ''अर्थ-निर्मितीला बाधा येणार नाही असे लिहा'', हा एकमेव नियम त्यात असावा. बाकी ''मार्गदर्शक सूचना'' पाळण्याची सक्ती नसावी. मेंदूतल्या केंद्रांतून भावना आणि विचार उद्‌भवतात. भावना आणि विचार यातील अर्थ लेखकाकडून कागदावर लिखितपणातून साकारला जातो. म्हणजेच वैयक्तिकदृष्ट्या त्याने कागदावर त्याच्या मनातल्या अर्थाला पूर्णत्व दिलेले असते. अर्थाला नेहमीच पूर्णत्व असते ! अर्धवट अर्थ यालाही त्या अर्थाचे पूर्णत्व लाभलेले असते ! नियमांच्या चिखलात रुतलेल्या मराठीला बाहेर काढून नव्या युगाच्या संगणकीय वेगात सामील केले पाहिजे. मौखिक मराठीच्या गरुडपंखातील जास्तीत जास्त सामर्थ्य लिखित मराठीने यापुढे आत्मसात केले पाहिजे.

भाषांच्या जागतिकीकरणात मानवाच्या सर्व भाषांना एकत्र आणण्याचे सामर्थ्य मराठीत आहे. कागदी व संगणकीय वृत्तीत ती संस्कृत भाषेपेक्षा उत्तम आहे. मौखिक-मराठी हे मराठीचे सामर्थ्य आहे. त्याचा कागद आणि संगणक यातून सुयोग्य वापर करता येईल अशा रीतीने मराठीला बदलणे शक्य आहे. संगणकीय लेखनातून

मार्गदर्शक सूचना आपोआप पाळल्या जातील अशी रचना करता येते. लेखकाने संगणकीय लेखनातून चुका केल्या तरी त्या चुका संगणक आपोआप दुरुस्त करू शकेल अशी सोय करता येते. प्रमाणित भाषा, व्याकरण, लेखन-नियम यांना अधिक उच्च आणि लोकाभिमुख दर्जा संगणकातून मिळू शकेल.

'संगणकातून मराठी वापरता येणे हा मराठी माणसाचा जन्मसिद्ध हक्क आहे', असा फतवा मराठी मनामनात गोंदला गेला की तो नक्की साकार होईल. संगणकाच्या तंत्रज्ञानाचा बाऊ करू नका. जे येत नाही, माहीत नाही त्याची लाज बाळगण्याची गरज नाही. ते शिकण्याची संधी दवडू नका. कागदावर पेन्सिलीने लिहिण्यापेक्षा संगणकात मराठी लिहिणे सोपे आहे. त्यासाठीची साधने सर्वांना मोफत मिळालीच पाहिजेत. सरकारने रेशनकार्डातून ही सोय महाराष्ट्रातील सर्वांना करून द्यावी. संगणक हे मराठी जीवनाचे अविभाज्य अंग ठरले पाहिजे. ''संगणकाचा मराठीसाठी वापर करता येणे'' आणि ''संगणकातून मराठीचा वावर होणे'' या दोन्ही गोष्टी घराघरात, शाळाकॉलेजात, गल्लीबोळात, जगभरच्या मराठी मनामनात सहज-सुलभतेने पोचल्या पाहिजेत. तुमच्या मनातल्या मराठीची ही गरज तुम्ही बोलून दाखवा. मुलांनी पालकांना, विद्यार्थ्यांनी शिक्षकांना, शिक्षकांनी शाळेला, शाळा-शाळांनी सरकारला, लोकांनी पुढाऱ्यांना याबाबत मागणी करावी आणि ''मराठीचे संगणकीय आंदोलन'' निर्माण व्हावे. ■

**दूरध्वनी** : 91-22-26201473, **भ्रमणध्वनी** : 9833102727

ईमेल : Gangals123@gmail. com.

### अवकाशाच्या व्याप्तीचे आडवे परिमाण

ज्या जागतिकीकरणाच्या आणि माहिती तंत्रज्ञानाच्या रेट्यामुळे इंग्रजीचे महत्त्व वाढले आहे, त्या उत्तराधुनिक काळाचे इतरही अनेक पैलू आहेत. गतिमान संपर्क आणि जोडणीच्या साधनांमुळे संज्ञापन सुलभ झाले. त्यामुळे अंतरी निमिषार्धात पार करणे शक्य झाले आहे. प्रगती आणि वाढ मोजण्याचे उंची आणि शिखरांचे परिमाण अवकाशाच्या व्याप्तीच्या आडव्या परिमाणात परिणत झाले आहे. एक गोष्ट दुसरीची जागा न घेता दोन्ही गोष्टी एकाच वेळी एकमेकींशेजारी स्थिरावलेल्या दिसतात. रोजच्या व्यवहारातली सोपी उदाहरणे म्हणजे ब्रँडेड शीतपेये आल्यामुळे लस्सी किंवा उसाचा रस नाहीसा झाला नाही; जीन्समुळे बाजारातून सलवार-खमीज नाहीसे झाले नाहीत. पिझ्झ्यामुळे डोसे खाणे बंद झालेले नाही. हेही पाहिजे आणि तेही पाहिजे असाच विचार आणि पवित्रा दिसतो.

डॉ. नीती बडवे, दै.सकाळ, ११.१२.२००७

# मराठी भाषेचे शुद्धलेखन आणि उच्चारण

स्नेहल तावरे

मराठी साहित्य महामंडळाने शुद्धलेखनविषयक नियम १९६२ मध्ये केले आणि मराठी भाषकांनी हळूहळू ते अंमलात आणले. आज पंचेचाळीस वर्षांनंतर मराठी भाषेच्या शुद्धलेखनाची अवस्था पाहिली की या नियमांचे सुलभीकरण करणे गरजेचे आहे असे एक शिक्षक म्हणून मला जाणवायला लागले आहे. गेली पंचवीस वर्षे पुण्यातील मॉडर्न महाविद्यालयात मराठीचे अध्यापन मी करीत आहे. काही शाळांच्या कार्यकारिणीवर सदस्य म्हणून काम पाहते. भारती विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळावर मी आहे. महाविद्यालयातील माझे विद्यार्थी, शाळा-महाविद्यालयांच्या मुलाखतींसाठी येणारे शिक्षक-प्राध्यापक, स्नेहवर्धन प्रकाशनामुळे भेटणारे व्यावसायिक, लेखक, डी.टी.पी. ऑपरेटर, मुद्रितशोधक आणि सर्वसामान्य नागरिक यांच्यामध्ये वावरताना मराठी भाषेचे शुद्धलेखन आणि उच्चारण याबाबत काळजी करण्याजोगी परिस्थिती निर्माण झालेली आहे हे जाणवते. मराठी भाषेचे स्वरूप केवळ व्यवहारापुरते मर्यादित राहू नये, ती पिढ्यान्पिढ्या बोलली गेली पाहिजे, तिच्यामध्ये समृद्ध लेखन झाले पाहिजे, ती क्लिष्टही होता कामा नये आणि मराठी भाषकांप्रमाणे परभाषकांनाही मराठी भाषेची मूलभूत सुलभता जाणवली पाहिजे. आधुनिक क्षेत्रातील कॉलसेंटर वा विविध प्रसारमाध्यमे यामध्ये मराठी भाषकांना नोकरी विनासायास मिळाली पाहिजे. अशा प्रकारच्या सर्व बाबी लक्षात घेऊन मराठी भाषेच्या शुद्धलेखनविषयक नियमांत काही फेरबदल करून नियम अधिक सोपे करण्याची आवश्यकता मला जाणवते.

मराठी भाषेची परंपरा लक्षात घेतल्यास ती संस्कृतोद्भव आहे हे अनेक भाषा तज्ज्ञांनी मान्य केलेले आहे. संस्कृत भाषा पाचवीपासून किंवा काही शाळांमध्ये आठवीपासून शिकविली जात होती. संस्कृतमध्ये पैकीच्या पैकी गुण मिळविणारे अनेक विद्यार्थी आहेत. अकरावीच्या परीक्षेत 'जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलरशिप' मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांचे नाव वृत्तपत्रात अग्रक्रमाने झळकायचे. विद्यार्थी-पालक यांनाही या पारितोषिकाचे महत्त्व आणि अभिमान वाटायचा. आजकाल या पारितोषिकाचे नावही कोठे दिसत नाही. अशी परिस्थिती निर्माण होण्याचे कारण म्हणजे अनेक शाळांमधून

संस्कृत भाषा घेण्याची सक्ती कमी केली गेली. संस्कृत भाषा म्हणजे मृत भाषा, तिचा आजच्या जीवनाला उपयोग काय ? अशा वादाच्या भोवऱ्यात संस्कृत भाषा अडकली आणि मराठीच्या या जननीचा विसर पडला, पर्यायाने शब्दांचाही. संस्कृत भाषेमधून आलेले अनेक शब्द मराठीमध्ये स्थिरावलेले आहेत. अशा शब्दांचे लेखन मराठीत तत्सम शब्दांप्रमाणे होते. वस्तुत: संस्कृतची तोंडओळख नसल्यामुळे कोणते शब्द संस्कृतमधले आणि कोणते इतर भाषांमधले याबाबत विद्यार्थ्यांमध्ये एक संभ्रमावस्था आहे. त्यामुळे संस्कृतमधील मूळ शब्द तो मराठीत आला की त्याचे होणारे लेखन आणि सामासिक शब्दात त्याचे लेखन कसे करायचे याबाबत खूपच घोळ होताना दिसतात. म्हणूनच मराठीच्या शुद्धलेखनविषयक नियमांत काही बदल का करू नयेत याबद्दल विचार करण्याची परिस्थिती निर्माण झालेली आहे.

शुद्धलेखनाच्या नियमांपैकी एक नियम असा आहे - मराठीतील तत्सम 'इ'-कारान्त आणि 'उ'कारान्त शब्द दीर्घान्त लिहावेत. उदा० कवि=कवी, बुद्धि=बुद्धी, गति=गती इत्यादी. मात्र सामासिक शब्दांत तत्सम 'इ'कारान्त व 'उ'कारान्त शब्द पूर्वपदी असताना ऱ्हस्वान्तच लिहावे. उदाहरणार्थ, बुद्धिवैभव, कविमन, गतिशील इत्यादी.

या नियमाबाबत असे धोरण अंमलात आणावे की एखादा शब्द मराठी भाषेमध्ये जसा आहे तसा मान्य करून, तो सामासिक शब्दात आला तरी दीर्घच ठेवावा. उदाहरणार्थ, संस्कृतमध्ये 'कवि', मराठीत 'कवी' आणि तो सामासिक शब्दात आला की 'कविमन' असे न करता कवीमन, कवीवैभव तसेच कवीला, कवीसाठी, कवीकरीता (येथे करिता नाही) इत्यादी याचप्रमाणे गतीशील, बुद्धीवैभव, दृष्टीकोन, अग्नीकन्या, रुढीग्रस्त लिहावे; पण अशा प्रकारचा बदल संस्कृत भाषेवर प्रेम करणाऱ्यांना रुचणार नाही. सुटा शब्द जसा आहे तसाच तो सामासिक शब्दातही स्वीकारायचा असे धोरण का स्वीकारू नये ?

तत्सम 'इ'कारान्त आणि 'उ'कारान्त नियमाप्रमाणेच 'इन'अन्त शब्दांना असाच नियम लावल्यास ते दीर्घच होतील. उदाहरणार्थ, विद्यार्थीमंडळ, गुणीजन, प्राणीसंग्रह, पक्षीमित्र इत्यादी.

उपान्त्य दीर्घ ई किंवा ऊ असलेल्या मराठी शब्दांचा उपान्त्य 'ई'कार किंवा 'ऊ'कार उभयवचनी सामान्यरूपांच्या वेळी ऱ्हस्व लिहावा, या नियमाप्रमाणे वकील-वकिलांना, गरीब - गरिबाला, चूल - चुलीस इत्यादी. अशा शब्दांमध्ये मराठीतील मूळ शब्द जसा आहे तसाच का ठेवू नये ? असे केल्यास चूलीत, गरीबाला, वकीलांना, सूनेला, नागपूरास अशी रूपे होतील. नाहीतरी अपवाद म्हणून परीक्षा-



अनुक्रमणिका

परीक्षेला, दूत - दूताला, शरीर - शरीरास, जीव - जीवास (प्राणी या अर्थी) ही रूपे मान्य केलेली आहेतच. प्रश्न येतो तो काही समान शब्दांचा. उदाहरणार्थ, जिवाला (प्राण, मन या अर्थी) आणि जीवास (प्राणी या अर्थी) येथे दोन्ही ठिकाणीं जीवाला, जीवास, जीवाच्या असे केले तरी वाक्यानुसार अर्थ लक्षात येईल.

विद्यार्थ्यांच्या मनाची अनिश्चितता 'पूर' या शब्दाबाबत दिसून येते. पूर हा ग्रामवाचक शब्द ग्रामनामास लावताना दीर्घोपान्त्यच लिहावा, या नियमानुसार नागपूर, कोल्हापूर, सोलापूर, जयपूर असे लेखन होते. पण उपान्त्य दीर्घ 'ई' किंवा 'ऊ' असलेल्या मराठी शब्दांचा जो नियम आहे त्यानुसार 'नागपुरास' असे होते; पण नागपूरला, नागपूरसाठी, नागपूरने हे शब्द कसे लिहायचे ? अनेकांचा गोंधळ उडतो. 'नागपुरकरिता' लिहायचे की 'नागपूरकरिता' ? म्हणूनच वरील सर्वच शब्द दीर्घ का लिहू नयेत ? म्हणजे नागपूरास, नागपूरसाठी, नागपूरला, नागरपूरहून, नागपूरपासून इत्यादी.

शब्दांचे एकवचन आणि अनेकवचन लिहिताना विद्यार्थी घोळ घालतात. उदा० मैत्रीण-मैत्रिणी, उणीव-उणिवा, जाणीव-जाणिवा, टीप-टिपा, भारूड-भारुडे इत्यादी येथे अनेकवचन करताना ऱ्हस्व करण्यापेक्षा शब्द जसा आहे तसाच ठेवला तर ? म्हणजे मैत्रीणी, टीपा, भारूडे, इ. याबाबत माझी एक प्राचार्य मैत्रीण म्हणाली होती की, ''कान तयार करावे लागतात. मग ऱ्हस्व-दीर्घ कानाला आपोआप कळते आणि त्यानुसार लेखन होते.'' पण उभ्या महाराष्ट्रात असे 'कान' तयार करणारे किती शिक्षक आता मिळतील ? ग्रामीण-निमशहरी भागांचे काय करायचे ? त्यापेक्षा रूढ नियमांमध्ये बदल करून मराठीचे शुद्धलेखन सुलभ का करू नये ? असे सतत वाटत राहते.

ठरावीक, लवचीक, विपरीत या शब्दातील उपान्त्य उकार ९०टक्के लोक ऱ्हस्व लिहितात आणि त्यांना दीर्घ लिहा असे सांगितल्यास आम्हांला असेच शिकवले आहे असे म्हणतात. 'उज्ज्वला' नाव असणाऱ्या मुली 'उज्वला' असेच लिहितात. 'माउली' शब्दातील उ दीर्घच लिहिला जातो.

उच्चारानुसार लेखन हा नियम ग्राह्य धरल्यास च, ज बाबतचे उच्चार कसे करायचे ? असा प्रश्न उपस्थित होतो. उदाहरणार्थ, 'कृष्णा गाई चार' आणि 'वर्गात मुले चार.' या दोन वाक्यांमधील 'चार' या शब्दाचा उच्चार पहिल्या वाक्यात चार आणि दुसऱ्या वाक्यात मात्र 'च्यार' असा करावा लागतो. पाण्याचा जग आण, सुखाने जग या वाक्यांमध्ये पहिल्या वाक्यात 'ज्यग' असे म्हणावे लागते तर दुसऱ्या वाक्यात जग असे होते. म्हणजे चमचा, च्यमचा कधी म्हणायचे हे वाक्याप्रमाणे

ठरवायचे. हे पर भाषकांना आणि नवभाषकांना काहीसे अवघडच जाते. म्हणून एकतर या शब्दांच्या खाली नुक्ता दिला पाहिजे किंवा च्य, ज्य असे लेखन केले पाहिजे. समाजाला की समाज्याला म्हणायचे याबाबत एकमत कोठेच नाही.

शुद्धलेखनाप्रमाणेच मराठी उच्चाराच्या गमतीजमती हल्ली सार्वत्रिक दिसून येतात. श्री-ऐवजी स्त्री, ण-न, क्ष-श, य-ए यांबाबत अनेक विद्यार्थ्यांना उच्चाराची जाणीव नसते. फारच कमी विद्यार्थी वरील अक्षरे शुद्ध स्वरूपात उच्चारतात, एम.ए., एम. कॉम.ऐवजी यम. ये., यम. कॉम. असे ऐकू येते. 'प्रक्षुब्ध'ला 'प्रशुद्ध' म्हणतात. 'श्रीगणेशा'मधील 'श्री'चा उच्चार 'स्त्रीगनेशा' केला जातो हे बारकाईने लक्ष दिल्यास लक्षात येते. 'ण' म्हणजे एका विशिष्ट वर्गाची मक्तेदारी; ती नकोच म्हणून सरसकट 'न'चा वापर होत आहे. त्र्यंबकेश्वरी पौरोहित्य करणारे दीक्षित 'माझी बायको पुन्याची आहे.' असे म्हणतात तर मराठवाड्यातील देशमुखसर 'पन, मानिकबाई' असे जेव्हा बोलतात तेव्हा मराठीचे उच्चारण आणि लेखन सर्वच स्तरांत विस्कळीत झाले आहे, याची जाणीव होते. पुण्यासारख्या ठिकाणी एम.ए. मराठीच्या विद्यार्थ्यांना ऱ्हस्व रु आणि दीर्घ रू, य,ए,ण,न, श्री, स्त्री इ. अनेक उच्चार दरवर्षी मला शिकवावे लागतात. ९०टक्के लोक मराठीतील ओष्ठ्य 'फ'चा उच्चार इंग्रजीतील दंत्योष्ठ 'एफ' प्रमाणे करतात. (फणस, फजिती इत्यादी) हा फरक मराठी माणसे विसरत चालली आहेत. ब्राह्मण शब्द म्हशीतल्या म्ह (ब्राम्हण) प्रमाणे लिहिला जातो. मराठीत उच्चारानुसार लेखन ही पद्धत असल्यामुळे माझी गोखले नावाची मैत्रीण म्हणाली की 'म'च्या आधी 'ह'चा उच्चार करतो कोण ? सर्वच जण 'म' नंतर 'ह'चा उच्चार करतात. उच्चारानुसार लेखन हे मान्य केल्यास मराठीतील काही अक्षरे पूर्ण नष्ट होतील. उदाहरणार्थ, ण, ष, क्ष, श्री, ए, फ इत्यादी आणि पानी, भाशा, प्रशुद्ध, स्त्री, यम. ए. आणि फरक (फ फॅक्स प्रमाणे) हे शब्द रूढ होतील.

नाकात बोलणाऱ्यांच्या नको तेथे अनुस्वार देऊन बोलण्याच्या सवयीमुळे सानुनासिक बोलले की शुद्ध असा एक अपसमज रूढ झाला आहे. त्यामुळे 'पानी' म्हणायचे पण सानुनासिक : पानीं ! तेव्हा सानुनासिक बोलणारे उच्चारानुसार लेखन या मराठीच्या नियमाप्रमाणे मराठी चुकीचे बोलतात आणि त्यांचे अनुकरण करणारे मराठी भाषेच्या स्वरूपात बदल करतात हे लक्षात कोण घेणार ?

एक शिक्षक म्हणून मला जाणवणाऱ्या या गोष्टींचा मी सातत्याने विचार करीत असते. यावर कोणत्याही अभिनिवेशाशिवाय चर्चा का होऊ नये ? ■

मराठी विभाग प्रमुख,
मॉडर्न महाविद्यालय, शिवाजीनगर, पुणे 411 005. दूरभाष - 24472549



अनुक्रमणिका

प्रतिक्रिया

# मराठी शुद्धलेखन : फेरविचार ?

कृष्ण श्री. अर्जुनवाडकर

डॉ. स्नेहल तावरे यांचे 'शुद्धलेखनाचे सुलभीकरण झाले पाहिजे' असे मत आहे. त्यांच्या मते रूढ नियमांनुसार इकारान्त आणि उकारान्त शब्द काही संदर्भात दीर्घान्त (उदा० कालिदास हा कवी होता) तर काही संदर्भांत ऱ्हस्वान्त (उदा० कविमन या समासात) लिहिण्याचा नियम असल्यामुळे विद्यार्थी, लेखक, डीटीपी ऑपरेटर, मुद्रितशोधक इत्यादींचा गोंधळ होतो. उक्त गटांतील शब्द सर्वत्र दीर्घान्त लिहिण्याचे ठरविले तर गोंधळ कमी होतील.

लेखन हा प्रमाण भाषेतल्या उच्चाराचा प्रतिनिधी आहे. उक्त गटांतले शब्द जोवर स्वतंत्र म्हणून आणि समासघटक म्हणून वेगवेगळे उच्चारिले जातात, तोवर त्यांचे लेखन वेगवेगळे असणे हे योग्यच आहे. मातृभक्ती या शब्दातला मातृ हा पूर्वावयव स्वतंत्र येतो तेव्हा माता असे त्याचे रूप असते. गोंधळ होतो म्हणून सगळीकडे माता (माताभक्ती) हेच रूप लिहिण्याचे ठरविले तर प्रमाण उच्चारांत गोंधळ होईल त्याचे काय ? मुळात भाषा ही उच्चारणात्मक आहे. लेखन हे तिचे सोयीसाठी निर्माण केलेले दृश्य रूप आहे. हा मूलभूत भाषण-लेखनसंबंधच उक्त सूचनेत वाऱ्यावर सोडला आहे. वस्तुत: आज अस्तित्वात असलेले शुद्धलेखनाचे नियम गेल्या शतकात महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या वतीने मांडण्यात आले असून शासनाने स्वीकारले आहेत, आणि शिक्षणसंस्थांत चालू आहेत. त्यांत जुन्या शुद्धलेखनातले अनुच्चारित अनुस्वार गाळण्यात आले आहेत. उच्चारात नसलेला या नियमांचा भाग म्हणजे नपुंसकलिंगी शब्दांची एकारान्त रूपे. (उदा० 'रूपे' हेच रूप.) एवढा भाग सोडला तर हे नियम उच्चारित प्रमाण भाषेला जवळ आहेत. योग्य शिक्षण हा गोंधळावरचा उपाय आहे; उच्चारांत नसलेली रूपे सोयीसाठी लिहिण्यात मान्य करणे हा नव्हे. मराठीच्या अनेक बोली आहेत; त्यांत अनेक शब्दांचे उच्चार भिन्न आहेत. या बोली बोलणाऱ्यांची सोय म्हणून बोलीतले उच्चार लिहिण्याची पद्धत चालवून घेतली तर लेखनाला काही धरबंधच राहणार नाही. प्रमाणभाषा आणि प्रमाणलेखन या संकल्पना अस्तित्वात आल्या आणि स्थिर झाल्या त्या याच कारणामुळे. कथा-कादंबऱ्यांत, नाटकांत पात्राच्या उच्चारानुसार लेखन (न्हवं, ऱ्हय) केले तर कोणी

आक्षेप घेणार नाही; कारण या वाङ्मयात वास्तव जीवनाचेच प्रतिबिंब अपेक्षित असते.

मला स्वत:ला असे वाटते की ज्या कारणासाठी (उच्चारात नाही म्हणून) प्रमाण-लेखनात नपुंसकलिंगी एकारान्त शब्दांवरचा अनुस्वार गाळण्याचा नियम केला, त्याच कारणासाठी त्याचा अंत्य एकारही अकारात परिवर्तित करणे (कथा-कादंबऱ्यांत करतात तसा) योग्य झाले असते. (उदाहरणार्थ, 'चांगले बेणे' याऐवजी 'चांगलं बेणं') अनुस्वार गाळून एकार राखणं ही अर्धवट सुधारणा आहे. याच भूमिकेवरून मी 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' (१९८७) आणि 'मराठी व्याकरणाचा इतिहास' (१९९२) या माझ्या शास्त्रीय ग्रंथांत अन्त्य दीर्घ अ कथाकादंबऱ्यांत लिहितात तसा लिहिला आहे. याविषयीची माझी भूमिका आणि अधिक सुधारणेची दिशा प्रथम निर्दिष्ट ग्रंथाच्या प्रास्ताविकात पाहावी. ज्या माझ्या लेखनाचे प्रकाशन ही इतरांची जबाबदारी आहे, त्या लेखनात मी महामंडळाचे नियम अनुसरतो.

जगातल्या सर्वच मान्य भाषांचे लेखनाचे नियम आहेत; त्या भाषा शिकणाऱ्यांना ते पाळावे लागतात. ही एक सुसंस्कृततेची निशाणी आहे. शेवटी, नियम अस्तित्वात आले त्यामुळे लेखनात समानता आली. हे नियम बहुतांशी उच्चारणाशी सुसंगत आहेत. लेखनाचे सुलभीकरण हे आधारतत्त्व घेतले तर लेखन आणि उच्चारण यांचा संबंधच नाहीसा होईल. 'कवी' आणि 'कविमन' या लेखनांत एकच शब्द दोन प्रकारांनी (दीर्घान्त आणि ऱ्हस्वान्त) लिहिण्याच्या नियमाचा आधार स्वतंत्र पद आणि समासाचे पूर्वपद यांच्या उच्चारांतला भेद हा आहे. तिकीट काढण्यासाठी रांग लावण्याने गोंधळ वाढत नाही; कमी होतो. कोणत्याही सामान्य व्यवस्थेचे नियम ही प्रगत संस्कृतीची निशाणी आहे; मुळात जाऊन विचार केला तर ती कमीत कमी श्रमांत अधिकांत अधिक लोकांची सोय आहे. विद्यार्थी, लेखक, डीटीपी ऑपरेटर, मुद्रितशोधक इत्यादींनी ही नियमांची पार्श्वभूमी समजावून घेतली पाहिजे. कंप्युटर चालविता आला की बस्; शुद्धलेखनाचे नियम शिकण्याचा खटाटोप कशाला ? ही दृष्टी बदलली पाहिजे. यंत्र चालविणाऱ्याला लेखनाचे नियम माहीत असले म्हणजे मुद्रितशोधनाचे काम हलके होते, आणि अंतिम प्रकाशन निर्दोष होते. आज पुण्यातल्या बऱ्याच रस्त्यांवर वाहतुकीचे नियम धाब्यावर बसविले जातात. त्यामुळे रस्त्यांची दुरवस्था झाली आहे. तशी पाठ्यपुस्तकांची झाली तर ? वस्तुत: तशी ती काही प्रमाणात झालीच आहे, हे बारावीचे संस्कृताचे पुस्तक पाहिल्यावर माझ्या लक्षात आले. विवेक सुटला तर या परिस्थितीतून मानवाला वाचविण्याचे सामर्थ्य एका परमेश्वरालाच आहे ! ■

2, देवांगिनी, 1192, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.
दूरध्वनी : 24479419





अनुक्रमणिका

**दखलयोग्य**

# न्यायालयात हवी मराठी

भगवंतराव दुर्गे

न्यायालयात मराठीतून कामकाजाबाबत अधूनमधून बातम्या येत असतात. कनिष्ठ न्यायालयात अधिकाधिक कामकाज मराठीतून व्हावे, असा आग्रह असल्याचे उच्च न्यायालयाने स्पष्ट केले आहे. उच्च न्यायालयाला मराठीबाबत स्पष्टीकरण देऊन स्वत:चे समर्थन करण्याची वेळ का आली ? महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४ मान्य होऊन सन १९६५चा महाराष्ट्र अधिनियम क्र.५ म्हणून अमलात आला. दिवाणी प्रक्रिया संहिता कलम १३७ (२) व फौजदारी प्रक्रिया संहिता कलम २७२ अन्वये राज्य शासनाला असलेल्या अधिकारानुसार ता. ३०-४-१९६६ रोजी अधिसूचना काढून उच्च न्यायालयाला दुय्यम असणाऱ्या न्यायालयाची भाषा १ मे १९६६ पासून मराठी निश्चित करण्यात आली. त्यामुळे कनिष्ठ न्यायालयाची भाषा कायद्याने मराठी झाली. त्यात वेळोवेळी दुरुस्त्या करण्यात येऊन २१ जुलै १९९८ रोजी कनिष्ठ न्यायालयातील सर्व कामकाज केवळ मराठीतून करणे कायदेशीर ठरून इंग्रजीतून करणे बेकायदा ठरले. मुंबई उच्च न्यायालयाच्या निदर्शनास याची माहिती आणून दिली असता, त्यांनी या ना त्या कारणाने चालढकल चालविली आहे. न्यायालयेच कायदा पाळत नाहीत व या कामी मुंबई उच्च न्यायालय आडकाठी आणते, असा समज जनतेकडून वृत्तपत्रांत जाहीर होऊ लागल्यामुळे उच्च न्यायालयाचे महाप्रबंधक श्री. किनगावकर यांना १७ नोव्हेंबर २००५ रोजी 'मराठीत कामकाज करण्यास उच्च न्यायालयाची आडकाठी नाही,' असा खुलासा करावा लागला. दुय्यम न्यायालयात कोणतेही लिखाण पक्षकाराकडून दाखल करताना कायद्यातील तरतुदीनुसार मराठीत असल्यासच स्वीकारणे कायदेशीर असून, इंग्रजीतील स्वीकारणे बेकायदेशीर आहे, ही बाब निदर्शनास आणल्यावर मुंबई उच्च न्यायालयाने ता. ९ डिसेंबर २००५ रोजी ५० टक्के कामकाज मराठीत करण्याचे व धनादेशाचे व तत्सम दाव्यांचे/खटल्यांचे कामकाज १०० टक्के मराठीत करण्याचे परिपत्रक जारी केले.

मध्यंतरीच्या काळात ता. २-२-२००५ रोजी मुख्यमंत्री व मुख्य न्यायमूर्ती यांची बैठक होऊ मराठी लघुलेखकांची ३० पदे निर्माण करण्याचे व विद्यमान लघुलेखकांना

मराठीचे प्रशिक्षण देण्याचे ठरले; परंतु शासन व न्याय खाते उदासीनच राहिले. प्रशिक्षण आणि अस्तित्वात असलेल्या संगणकावर मराठीत म्हणजे देवनागरी लिपीत काम करता येते, असे न्यायालयातील कर्मचारी सांगत असताही रोजनामा मराठीत लिहिला जात असे, तो इंग्रजीत लिहिला जाऊ लागला. ही बाब उच्च न्यायालयाच्या नजरेस आणल्यानंतर उच्च न्यायालयाने पुन्हा परिपत्रक काढून रोजनामा मराठीत लिहिण्याचे आदेश दिले (सकाळ : १५-८-०७) उच्च न्यायालयाच्या आदेशामध्ये 'शक्यतो' असा शब्दप्रयोग वापरला जात असून, सुस्पष्ट आदेश दिले जात नाहीत. त्यामुळे मराठीच्या कार्यवाहीचे पर्यायी अधिकार कनिष्ठ न्यायालयांना दिले जातात व त्याचा परिणाम उलटा होऊन रोजनामा जो मराठीत होता तोदेखील इंग्रजीत झाला. वास्तविक दिवाणी प्रक्रिया संहितेचा प्राधिकृत मराठी पाठ मध्यवर्ती शासनाने राष्ट्रपतींच्या नावे २१ जून १९९१ रोजी राजपत्रित करूनही त्याचा वापर न्यायालये करीत नाहीत व सिव्हिल प्रोसिजर कोडची जागा दिवाणी प्रक्रिया संहितेने घेतली असताही न्यायालये बेकायदेशीर कृत्यास आळा घालीत नाहीत आणि उच्च न्यायालय त्याकडे काणाडोळा करते. मराठीची स्थिती पारतंत्र्यातील 'जरी आज ती राजभाषा नसे'च्या ऐवजी 'जरी आज ती राजभाषा असे' अशी होऊनही मराठीच्या केविलवाण्या अवस्थेबद्दल राज्यकर्त्यांना व उच्चभ्रूंना खंत नाही. उलट इंग्रजीचे वर्चस्व वाढवले जात आहे. आम्ही आत्मभान आणि आत्मसन्मान गमावून बसलो आहोत काय? मराठीचे केवळ आम्हीच त्राते व अभिमानी म्हणवून घेणारे मूळ मुद्द्याकडे दुर्लक्ष करीत आहोत. न्यायालयातील कामकाज मराठीतून करण्यास काहीच अडचण नाही. कनिष्ठ न्यायालयातील कामकाज शंभर टक्के मराठीतून करण्यास सुरवात केल्यास मराठी भाषा समृद्ध, समर्थ होईल. खऱ्या अर्थाने मराठीला राजभाषेचा दर्जा प्राप्त होईल.

स्वतंत्र भारतातील शासन व न्याय विभागाने मराठीचा न्यूनगंड दूर करणे आवश्यक आहे. शासन-अधिसूचनेचे पालन व पोषण करण्याची प्राथमिक व प्रारंभिक जबाबदारी शासकीय अधिकारी व शासनकर्त्यांवर आहे. जिल्हा सरकारी वकिलांनीदेखील याची जाणीव ठेवली पाहिजे, किंबहुना कायद्याचे पालन करणे व करवून घेणे त्यांचे काम आहे. कायद्याचे पालन न्यायालयांकडून कटाक्षाने झाल्यास मराठी भाषा समृद्ध होईल व कायद्याचा आब राखला जाईल.

■

दै.सकाळ १८.०९.०७

# उच्च न्यायालयाच्या दारातही मराठीला रट्टाच !

न्या. राजन कोचर

मुंबई हायकोर्ट आता केवळ भौगोलिकदृष्ट्याच महाराष्ट्रात शिल्लक राहिले आहे. हायकोर्टाच्या उंच ऐतिहासिक बुरुजांनी हुतात्मा चौकातील कामगार-शेतकऱ्यांच्या प्रतीकांना ठेंगाच दाखविला आहे. १०५ हुतात्म्यांच्या मराठी मातृभाषेची आजपर्यंत मिळालेल्या अवघ्या वीतभर जागेतून ही हकालपट्टी झाली आहे. एरवी जनतेच्या उंबरठ्यापर्यंत न्यायदान-प्रक्रिया नेण्यासाठी न्यायपालिका सदैव प्रयत्नशील असते, असा आभास किंवा देखावा निर्माण करणाऱ्या न्यायमूर्तींनी आता महाराष्ट्राच्या हायकोर्टात इंग्रजी भाषेशिवाय प्रवेशच निषिद्ध केला आहे. मराठी या जनभाषेला, शासकीय भाषेला चक्क दारातसुद्धा उभे राहता येणार नाही ! हायकोर्टात दाखल होणारी प्रत्येक याचिका, अर्ज, खटला व त्यासोबतची सर्व मराठी किंवा इतर देशी भाषांमध्ये असणारी कागदपत्रे व दस्तऐवज इंग्रजीत भाषांतरित केल्याशिवाय कोर्टाचं ऑफिस स्वीकारणारच नाही ! मराठीतूनच न्यायाधीशांनी निकाल लिहिण्यास प्रोत्साहित करणाऱ्या न्यायसंस्थेनेच आता मराठीतल्या निकालपत्रांचे, शासकीय परिपत्रकांचे, निर्णयांचे, खातेनिहाय चौकशी अहवालांचे किंबहुना जे काही मराठी लिखाण कोर्टापुढे सादर करायचे असेल त्या सर्व दस्तऐवजांचं इंग्रजीत भाषांतर करण्याचा आदेशच दिला आहे.

विशेष नमूद करण्यासारखं हे की या नियमाच्या घटनात्मक वैधतेला कुणीच आव्हान दिले नव्हते; त्या याचिकेत हा मुद्दा कुणीच उपस्थित केला नसताना स्वत: खंडपीठानेच तो उपस्थित करून संबंधित ॲपेलेट साईडच्या बार असोसिएशनला नोटीस काढून त्या वकील संघटनेचे म्हणणे ऐकून न घेता स्वत:च्या वैयक्तिक मतांच्या आधारेच या अत्यंत सार्वजनिक महत्त्वाच्या मुद्यावर विपरीत निर्णय दिला. वास्तविक ज्याप्रकारे दोन विद्वान वकिलांनी स्वत:हून त्या सुनावणीत वकील संघटनेने स्वत:हून दखल घेऊन व उपस्थित राहून त्या नियमाचे संरक्षण करावयास पाहिजे होते. हायकोर्टातील ॲपेलेट साईड वकील संघटना मुंबई व मुंबई बाहेरील महाराष्ट्राच्या सामान्य जनतेच्या न्यायासाठी झटणारी संघटना मानली जाते. त्यांनीसुद्धा या इतक्या महत्त्वाच्या मुद्द्याकडे कसे दुर्लक्ष केले, याचेच मला आश्चर्य वाटते. खरं पाहता हा नियम काळाच्या

कसोटीत व लोकशाही प्रणालीच्या न्यायदान प्रक्रियेत सर्वमान्य ठरला होता. अगदी मराठी द्वेष्ट्यानेसुद्धा या नियमाच्या घटनात्मक वैधतेला आजपर्यंत आव्हान दिले नव्हते. लोकशाहीत लोकांच्या न्यायप्रक्रियेत लोकांचा जास्तीत जास्त सहभाग असावा हे तत्त्वच संविधानाचे एक मूलभूत अंग आहे, याबाबत कुणाचेही दुमत नसावे. अगदी घटनेनेसुद्धा आमच्या देशी भाषांना (कलम ३४४, अधिसूची आठ) मान्यता दिली असून, कलम ३४८(२)मध्ये तर राज्यपालांना असा अधिकारच बहाल करण्यात आला आहे की, त्यांना संबंधित हायकोर्टाचे कामकाज त्या राज्याच्या भाषेत चालविण्यास परवानगी मागणारा अर्ज राष्ट्रपतींकडे करता येईल. या अधिकाराचा वापर १ मे १९६० नंतर महाराष्ट्राने का केला नाही हे समजत नाही. अपवाद फक्त तामिळनाडू सरकारचाच म्हणावा लागेल. त्या सरकारने तसा अर्ज राष्ट्रपतींकडे केला असून, तो अजून अनिर्णित आहे; पण त्या सरकारने हायकोर्टाचे कामकाज तमिळ भाषेत व्हावे, असा प्रयत्न केल्याची नोंद इतिहासात जरूर होईल. निदान आता तरी या निर्णयानंतर महाराष्ट्राचे लोकाभिमुख शासन या बाबतीत गांभीर्याने विचार करील असे वाटते. विशेषत: महाराष्ट्राची राजभाषा मराठी असून, सर्व परिपत्रके, शासन-निर्णय व इतर सर्व शासकीय व्यवहार, नियम ३.३ जे काही मराठीत असेल त्यांचे इंग्रजी भाषांतर करण्याचा आदेशसुद्धा खंडपीठाने शासनाला दिला आहे. या खंडपीठातील विद्यमान न्यायमूर्ती रिबेल्लो हे प्रागतिक विचारांचे व सामाजिक न्यायाशी बांधिलकी असलेले व गरिबांसाठी कणव असलेले व एकेकाळचे जनता पार्टीचे गोव्याचे आमदार होते, तसेच ते ख्यातनाम वकील म्हणून नावाजलेले होते. तर दुसरे न्यायमूर्ती राजेंद्र सावंत हे सरकारी वकील होते व सर्वसामान्यांच्या अडचणींची जाणीव असलेले होते. अशी पूर्वपीठिका असलेल्या न्यायमूर्तीद्वयींकडून आलेला हा निर्णय जनहिताचा नाही, लोकाभिमुख नाही व न्यायदान-प्रक्रियेला साजेसा नाही. मुंबई हायकोर्टाच्या पूर्ण कोर्टाने (चेंबर मीटिंग) सर्वसंमतीने केलेला हा नियम दोन न्यायमूर्तींनी वैधानिक आव्हान नसताना रद्दबातल करणे मला अयोग्यच वाटते. वास्तविक त्यांनी हा विषय चेंबर मीटिंगकडेच सोपविला पाहिजे होता. चेंबर मीटिंगमध्ये ४८हून अधिक न्यायमूर्ती विचार करून निर्णय घेतात. हा नियम तितक्याच संख्येच्या न्यायमूर्तींच्या सभेत झाला होता. अधिक खटकणारी गोष्ट म्हणजे सन्माननीय खंडपीठाने हायकोर्टाच्या रजिस्ट्रार जनरल यांना नोटीस पाठवून हायकोर्टाचं म्हणणं मांडण्यास संधी दिली असताना हायकोर्टातर्फे कुणीच युक्तिवाद करून नियम कसा योग्य आहे व कसा घटनाबाह्य नाही, अशी बाजू मांडली नाही. विद्वान रजिस्ट्रार जनरल यांनी आपलं एक शपथपत्र दाखल करून आपली जबाबदारी पार पाडून कायद्याचा प्रश्न कोर्टावरच सोपविलेला दिसतो.

शपथपत्रातून  कायद्याचा कसा ऊहापोह करता येतो हे रजिस्ट्रार जनरल व कोर्टच जाणोत. हायकोर्टातर्फे सुद्धा माननीय न्यायमूर्तींना असिस्ट केल्याचे दिसत नाही. एरवी सर्व महत्त्वाच्या केसेसमध्ये हायकोर्टातर्फे विशेष वरिष्ठ व नामांकित वकील नेमण्यात येतो. येथे असे का झाले नाही हे फक्त न्यायदेवताच जाणो ! चेंबर मीटिंगमध्ये सर्वसंमत असा हा नियम कसा योग्य व वैध आहे हे पटवून देण्यात हायकोर्टाने कुचराई का केली याचे आश्चर्यच वाटते.

**कलम ३४८**

सन्माननीय विद्वान न्यायमूर्ती रिबेल्लो यांनी उपनिर्दिष्ट नियम घटनाबाह्य ठरवताना कलम ३४८चा आधार घेतला आहे. ते कलम खालीलप्रमाणे आहे :

३४८(१) या भागाच्या पूर्वभागी उपबंधात काहीही असले तरी, संसद कायद्याद्वारे अन्यथा उपबंध करीपर्यंत
(क) सर्वोच्च न्यायालयातील व सर्व उच्च न्यायालयातील सर्व कार्यवाही इंग्रजी भाषेत असतील.

३४८(२) खंड (१)चा उपखंड (क) यात काहीही असले तरी, राज्याच्या राज्यपालास राष्ट्रपतींच्या पूर्वसंमतीने, त्या राज्यात ज्याचे मुख्य कार्यस्थान असेल अशा उच्च न्यायालयातील कामकाजात हिंदी भाषेचा किंवा त्या राज्याच्या कोणत्याही शासकीय प्रयोजनाकरिता वापरल्या जाणाऱ्या अन्य कोणत्याही भाषेचा वापर प्राधिकृत करता येईल.

सर्वोच्च व उच्च न्यायालयांची भाषा इंग्रजी असेल हे निर्विवाद आहे; परंतु इंग्रजीच असेल ('ओन्ली इंग्लिश') असे अभिप्रेत नाही. इंग्रजीच्या ऐवजी जर हिंदी किंवा अन्य कोणतीही भारतीय भाषा न्यायालयाची भाषा होऊ शकते तर इंग्रजीबरोबर इतर भाषा का चालू शकणार नाही ? कलम ३४८(२)ने तशी तरतूदही केलेली आहे. शिवाय घटनेच्या कलम ३४४ व आठव्या अनुसूचीद्वारे भारतीय भाषांना मान्यता मिळालेली आहे हे कसे विसरून चालेल ? म्हणजेच या सर्व बाबींचा विचार करूनच मुंबई उच्च न्यायालयाच्या पूर्ण चेंबरने इंग्रजी मुख्य भाषेबरोबरच मराठी दस्तऐवज अनुवाद न करताच दाखल करून घेण्याच्या परवानगीचा नियम करून दूरदृष्टी व संवैधानिक सुज्ञपणा दाखवला होता व समंजसपणाची अट घालून पक्षकारांना व त्यांच्या वकिलांना पाहिजे त्या वेळी भाषांतर करून देण्याची हमी देण्यास सांगितले, हा सर्वमान्य समंजसपणा सर्वमान्य झाला होता व आहे. कलम ३४८(१)चा अगदीच तांत्रिक, संकुचित अर्थ लावून या सुवर्णमध्य नियमाला खंडपीठाने विनाकारण छेद दिला, असे विनम्रपणे म्हणावेसे वाटते.

**इंग्लंडमध्ये झालेला बदल :**

येथे एक गोष्ट खास नोंदवावीशी वाटते ती ही की, इंग्लंड म्हणजे आपल्या एकेकाळचा मायबाप सरकारच्या देशातसुद्धा फ्रेंच विरुद्ध इंग्लिश असा संघर्ष अनेक शतकं चालला होता. त्या वेळी कोर्टाची भाषा फ्रेंच होती. अनेक वर्षांच्या संघर्षांनंतर तेथील राजेशाही सरकारने सन १३२७मध्ये फ्रेंचबरोबर इंग्रजीचा वापर करण्यास मुभा दिली. नंतर सन १३६२मध्ये इतिहासात प्रथमच राजाचं भाषण इंग्रजीत झालं व त्याच वर्षी म्हणजे सन १३६२मध्ये तेथील पार्लमेंटने 'स्टॅट्युटस ऑफ प्लीडिंग' हा कायदा करून कोर्टाचं सर्व काम इंग्रजीतून चालविण्याचा कायदा केला. त्याचं जे कारण इंग्लंडच्या राजाने सन १३६२मध्ये दिलं ते फारच महत्त्वाचं आहे व ते कारण आपल्या सन्माननीय विद्वान न्यायमूर्तींनी मान्य केलं पाहिजे. तसा कायदा करण्याचं सरळ कारण राजाने दिलं की, 'फॉर दि फ्रेंच टंग इज् मच् अन्नोन इन् धिस रेल्म' (फ्रेंच भाषा फार कमी लोकांना समजते) म्हणून कोर्टाचं कामकाज इंग्रजीत चालविण्याचा चक्क कायदाच इंग्रज राजाने केला व त्यामुळे इंग्रजी भाषेचा वापर सर्वत्र वेगाने सुरू झाला. हा इतिहास ज्या वेळचा त्या वेळी इंग्लंडमध्ये लोकशाही नव्हती, तरी राजाला असे वाटावे की, कोर्टाचाच काय तर सर्व सार्वजनिक कारभार इंग्रजीत म्हणजेच लोकांच्या भाषेत चालावा, हे फार महत्त्वाचे ! दुर्दैवाने आज स्वातंत्र्याच्या ६० वर्षांहून अधिक वयाच्या लोकशाहीतही आमच्या कोर्टात लोकांच्या भाषेचा असा अव्हेर उघड उघड होताना आम्हांला उघड्या डोळ्यांनी पाहावे लागत आहे. आज महाराष्ट्रात मराठीला हायकोर्टात दुय्यमसुद्धा स्थान नाही हे सत्य ! या निर्णयाने उच्च न्यायालयातून मराठीचे उच्चाटनच झाले आहे. केवळ मराठीत असलेले दस्तऐवज किंवा कागदपत्रे हायकोर्ट स्वीकारणार नाही. इंग्रजी भाषांतर सक्तीचे झाले आहे. या निर्णयाने महाराष्ट्राची व मराठी जनतेची व भाषेची अस्मिता दुखावली गेली आहे हे निश्चित. हा नियम घटनाबाह्य ठरवताना खंडपीठाने एक कारण असे दिले आहे की, मुंबई हायकोर्ट हे गोवा राज्याचे व दीव-दमण-नगर हवेली, सिल्वासा या संघराज्यांचेसुद्धा आहे व त्या प्रदेशात मराठी भाषा राजभाषा नाही. हे कारण न पटण्याजोगे आहे. मूठभर लोकांसाठी महाराष्ट्र राज्याची अशी हेटाळणी फक्त येथेच होऊ शकते. तामिळनाडू व पश्चिम बंगालमध्ये असे होणे अशक्यच; कारण तेथील जनता याबाबतीत अत्यंत जागरूक व असले निर्णय सहन न करणारी आहे. महाराष्ट्रातच मराठीच्या इंग्रजी भाषांतराची सक्ती होऊ शकते. जर गोवा राज्याला मराठीचा नियम मान्य नसेल तर त्यांच्यासाठी स्वतंत्र हायकोर्ट स्थापण्यात यावे व तसेच दीव-दमण इत्यादी प्रदेशांना गुजरात हायकोर्टाशी संलग्न करावे.

कलम ३४८(१)चा अर्थ अत्यंत संकुचितपणे व तांत्रिकपणे लावला गेला आहे. घटनात्मक बाबींचे निर्णय अत्यंत व्यापक व सर्वसमावेशक तत्त्वानुसारच दिले जातात, तसेच हा निर्णय घटनेच्या निर्देशक तत्त्वांतही न बसणारा आहे हे दाखवता येईल. या निर्णयामुळे सामान्य गरीब माणसाला हायकोर्टाचा खर्च न परवडणाराच होईल. भाषांतराचा खर्च अनेकवेळा न पेलणाराच ठरतो.

या सर्व बाबींचा व दूरगामी परिणामांचा विचार खंडपीठाने मुळीच केलेला नाही हे निकालपत्रावरून स्पष्ट आहे. तरी सन्माननीय इतर न्यायमूर्तींनी व सन्माननीय मुख्य न्यायमूर्तींनी हा नियम पुन:स्थापित करण्यासाठी योग्य ते करावे. ॲपेलेटसाईडच्या विद्वान व सुज्ञ कायदेपंडितांनीसुद्धा वेळीच कारवाई करून त्यांच्यावर असलेली एक सामाजिक जबाबदारी पार पाडावी हे विनम्रपणे सांगावेसे वाटते. या निर्णयात एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती ही की, या रिट याचिकेतील मराठी दस्तऐवज सन्माननीय न्यायमूर्तींना समजलेच नव्हते असे नाही. मराठी व कोकणी या भगिनीच मानल्या जातात. निदान न्या. राजेंद्र सावंत यांची मातृभाषा मराठी असल्याने मराठी न समजण्याची त्यांची तक्रार असणे शक्यच नाही व त्यांनी न्या. रिबेल्लो यांना समजावून सांगितले असते. मराठी न्यायमूर्ती अमराठी न्यायमूर्तीला मराठी दस्तऐवजाचा अर्थ सदैव सांगत आले आहेत. अशा परिस्थितीत सन्माननीय खंडपीठाला मराठीचा मुद्दा निकालात काढावयाचाच होता, असे स्पष्ट दिसते. न्यायदान करण्यात मराठी कागदपत्रांची फार मोठी अडचण निर्माण झाली होती, असेही दिसत नाही. एकूणच हा निर्णय न्यायसंगत म्हणता येणार नाही.

**हा निर्णयच विवाद्य आहे**

या निर्णयाची वैधानिकतासुद्धा विवादास्पद वाटते. हा निर्णय खंडपीठाने एका याचिकेच्या सुनावणीच्यावेळी दिलेला असल्याने हायकोर्टाच्या ऑफिसवर निश्चितच बंधनकारक असू शकेल; पण मग प्रश्न तेथेच संपतो. इंग्रजी भाषांतराशिवाय ऑफिसने मराठी दस्तऐवज नाकारण्याचे ठरविल्यावर पक्षकारापुढे दोनच पर्याय उरतात : एक तर शरणागती पत्करून मुकाट्याने भाषांतर देणे किंवा सरळ प्रस्तुत खंडपीठाच्या निर्णयालाच आव्हान देणे. हा खटाटोप खर्चिक ठरणारा असला तरी मराठी भाषेसाठी झगडणारी व्यक्ती/संस्था खर्चाची परवा न करता तो करू शकेल. ज्यावेळी एखाद्या दाव्यात, खटल्यात किंवा याचिकेत कुठल्याही पक्षकाराने एखादा मुद्दा उपस्थित केलाच नसेल आणि तसा मुद्दा निर्माणही होत नसेल तर कोर्टाने त्या बाबतीत मौनच बाळगायचे असते; कुठलीही टिप्पणी (कॉमेंट) किंवा निर्णय द्यायचा नसतो. कोर्टापुढील पक्षकारांच्या वादात किंवा विवादात उपस्थित न झालेल्या मुद्याबाबत जर कोर्टाने



अनुक्रमणिका

स्वत:च निर्णय किंवा टिप्पणी दिली असेल तर ते फक्त त्या सन्माननीय न्यायमूर्तींचे मत किंवा अभिमतच (ऑबिटर) ठरते व ते कायद्याच्या परिभाषेत बंधनकारक मानता येत नाही, 'बाइंडिंग प्रीसिडंट' किंवा 'जज्मेंट' मानलं जात नाही. प्रस्तुत याचिकेत मराठी भाषांतराची परवानगी देणाऱ्या नियमाच्या घटनात्मक वैधानिकतेचा प्रश्नच उपस्थित केला गेला नव्हता, तरी खंडपीठाने स्वत: (सुओ मोटो) उपस्थित करून निर्णय दिला म्हणून ते केवळ त्यांचे अभिमतच मानले गेले पाहिजे. पूर्ण पीठाच्या न्यायमूर्तींनी याचाही विचार करावा किंवा सन्माननीय मुख्य न्यायमूर्तींनी हा मुद्दा अत्यंत गंभीर व महत्त्वाचा मानून पूर्ण पीठापुढे निर्णयार्थ सुपूर्द करावा म्हणजे निदान महाराष्ट्रापुरता तरी हा प्रश्न निकालात निघेल. महाराष्ट्राच्या प्रगतिशील मुख्यमंत्र्यांनी पुढाकार घेऊन घटनेचे कलम ३४८(२) अंमलात आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा व सर्व पक्षांनी त्यांना साथ द्यावी. हा सर्वच देशी भाषांच्या अस्मितेचा प्रश्न आहे. या सर्व भाषांना निदान इंग्रजीच्या सहभाषा म्हणून न्यायपालिकेत सन्माननीय स्थान मिळावे. आमच्या भाषांचं प्रेम म्हणजे इंग्रजी भाषेचा विद्वेष मानण्याची घोडचूक कुणी करू नये. ■

'दै. लोकमत', ०१.०७.२००७

---

अस्सल दक्षिणी म्हणतात त्यांचे समशब्द मराठमोळे म्हणून वावरताहेत हा केवळ योगायोग म्हणता येणार नाही. पण अगदी बिनतोड पुरावा हवा असेल तर तो पुढचा आहे. जे आपल्याला 'अस्सल मराठी' वाटतं त्याला आपण 'मराठमोळं' म्हणते. अस्सल मराठी भाषेला आपण 'मराठमोळी' म्हणतो. पण या शब्दाचं मूळ तमिळ आहे. तमिळ मर्रा, (जो मराठीत 'मऱ्हा' होतो) म्हणजे 'न झाकलेलं, उघड किंवा स्पष्ट', ('मऱ्हाटाचि बोलु' ! ज्ञानेश्वरीत बावीस वेळा हा शब्द आला आहे. आणि त्याचा हाच अर्थ असल्याचं खैऱ्यांनी एका निबंधात दाखवून दिलं आहे.) मोळि म्हणजे बोली, भाषा.

स.ह. देशपांडे,
'विश्वनाथ खैरे यांचा संमतविचार आणि नवी भारतविद्या'

**दखलयोग्य**

# शिक्षण-मंडळच मराठीचे वैरी

**चंद्रकांत चौधरी**

दै. लोकसत्तेच्या २८ जुलैच्या 'आपणच मराठीचे वैरी' या शीर्षकाखालील लेखात मनोहर सूर्यवंशी यांनी 'मराठी शिक्षकांच्या खत्रुडपणामुळे मराठी मुलांची पीछेहाट होते,' असे म्हटले आहे. वास्तविक यात मराठी शिक्षकांचा कोणताही दोष नसून शालेय माध्यमिक शिक्षण मंडळाने जो विषयांच्या आठवड्यांच्या तासिकांचा तक्ता तयार केला आहे, तोच दोषपूर्ण आहे. या तक्त्यानुसार इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मराठी भाषा विषय शिकवला जातो. यामुळे मराठी शिक्षकांना पाचवी ते दहावीच्या विद्यार्थ्यांना मराठी भाषा विषय शिकवताना न्याय देता येत नाही.

आज महाराष्ट्रात बहुतांश शाळांनी इंग्रजी माध्यमाचा अभ्यासक्रम स्वीकारलेला असून माध्यमिक शिक्षण मंडळाने इंग्रजी माध्यमाच्या अभ्यासक्रमात इंग्रजी भाषा प्रथम, मराठी भाषा द्वितीय आणि हिंदी भाषेला तृतीय भाषा मानले आहे. वास्तविक या तिन्ही भाषा समान शंभर गुणांच्या आहेत. त्यांचा अभ्यासक्रम आणि परीक्षा-पद्धतीसुद्धा समान आहेत. तरी भाषा विषयांच्या तासिकांच्या नियोजन-तक्त्यात पाचवी ते आठवीकरिता इंग्रजीला सात, मराठीसाठी चार व हिंदीला सात, तर नववी व दहावीकरिता इंग्रजीला सहा, मराठीला चार व हिंदीला आठ अशा तासिका दिल्या आहेत. यामुळे इंग्रजी व हिंदीव्यतिरिक्त मराठी भाषेला द्वितीय भाषा समजून फक्त आठवड्याला चारच तासिका देऊन मंडळानेच मराठी भाषेवर अन्याय केला आहे. या नियोजन तक्त्याचा गैरफायदा घेऊन इंग्रजी माध्यमाच्या शाळा मराठी भाषेची, विद्यार्थ्यांची आणि मराठी शिक्षकांची गळचेपी करीत आहेत. एवढ्या कमी तासांत मराठी विषय शिकविताना मराठीला योग्य न्याय देता येत नाही.

विशेष म्हणजे तेवढ्याच गुणांचा समान अभ्यासक्रम असलेल्या हिंदी भाषेला, जरी ती राष्ट्रभाषा असली तरी, 'फॉरेन लँग्वेज'चा दर्जा देऊन मराठीपेक्षा दुप्पट तासिका दिल्या आहेत. त्यामुळे हिंदी विषय सहज शिकवून होतो, त्याची उजळणीही होऊन प्रसंगी त्यांच्या उर्वरित तासिका इतर विषयांना दिल्या जातात; परंतु फक्त चारच तासिका देण्यात आलेल्या मराठी भाषेचे क्रमिक पुस्तकही शिकवून होत नाही.

व्याकरण, निबंध लेखन, जाहिरात लेखन, सारांश लेखन इत्यादींची उजळणी करून घेण्यास शिक्षकांना पुरेसा वेळच मिळत नाही. अशी मराठी भाषेची माध्यमिक शालेय शिक्षण मंडळाकडूनच पीछेहाट करण्यात आलेली आहे.

जगातील पाच कठीण भाषांमध्ये मराठी भाषेचा क्रमांक लागतो. महाराष्ट्रात इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या इतर मातृभाषिक विद्यार्थ्यांना मराठी विषय शिकण्यास फारच कष्ट पडतात व आकलनाच्या दृष्टीनेही ती कठीण आहे; मात्र महाराष्ट्रात ती राजभाषा म्हणून शिकणे गरजेचेच आहे; परंतु महाराष्ट्र सरकारच्या अधिपत्याखालील 'शालेय शिक्षण मंडळाने'च ती शिकविण्याकरिता सर्व भाषांपेक्षा कमी तासिका देऊन राजभाषेवर अन्याय केला आहे. शालेय शिक्षणमंत्र्यांना व मंडळाला हे वारंवार कळवूनही त्यावर अद्याप उपाययोजना झालेली नाही, याचे सखेद आश्चर्य वाटते.

वास्तविक तिन्ही भाषांना मिळून एकूण अठरा तासिका असल्याने व परीक्षांसाठी त्यांना समान शंभर गुण व समान अभ्यासक्रम असल्याने या सर्व भाषांना आठवड्याला समान सहा तासिका देण्यात याव्यात आणि नियोजन तक्त्याखालील चुकीची टीप काढून टाकण्यात यावी, जेणेकरून मराठी भाषा विषयाची गळचेपी होणार नाही आणि मराठी शिक्षकांवर त्याचे नाहक खापर फोडले जाणार नाही !

■

**चंद्रकांत चौधरी, ठाणे**
('लोकसत्ता', १ ऑगस्ट २००७)

---

महाराष्ट्रात चारशेच्या वर डोंगरी किल्ले आहेत. कौटिलीय अर्थशास्त्रात किल्ल्यांचं वर्णन आहे; पण ते किल्ले डोंगरी नाहीत, भुईकोट आहेत. उलट तिरुक्कुरळ या तमिळ काव्यात (इ.स. सहावे शतक) एक सर्ग किल्ले या विषयावर आहे, त्यातलं वर्णन आणि अमात्यांच्या *राजनीती*तलं महाराष्ट्रातल्या किल्ल्यांचं वर्णन यांत पुष्कळच साम्य आहे. तमिळ प्रदेशात तर किल्लेच नाहीत ! मग तमिळमध्ये डोंगरी किल्ल्यांचं वर्णन कुठून आलं ?

**स.ह. देशपांडे,**
'विश्वनाथ खैरे यांचा संमतविचार आणि नवी भारतविद्या'

---

पुस्तक-परीक्षण

# 'रणांगण' समीक्षेचे मौलिक पुनरावलोकन

विद्यागौरी टिळक

[परीक्षित पुस्तक : ''रणांगण'- समीक्षेची साठ वर्षे; प्रा. एस.एस. नाडकर्णी; गोमंतक मराठी अकादमी, गोवा, मार्च २००६; पृ. १६७, किंमत १५० रु.]

'रणांगण' ही इ.स. १९३९ मध्ये प्रकाशित झालेली आणि आजवर चर्चेत राहिलेली मराठीतील एक लक्षणीय साहित्यकृती. वेगवेगळ्या निमित्तांनी, वेगवेगळे दृष्टिकोण स्वीकारून तिच्यावर अनेक नामवंत साहित्याभ्यासकांनी लिहिलेले आहे. या लेखनामधून 'रणांगण' ही एक महत्त्वाची, दर्जेदार अशी कलाकृती आहे, असा सूर वारंवार उमटलेला आहे. त्यामुळे तिच्यासंबंधीच्या विवेचनामधून तिच्या कोणकोणत्या पैलूंवर प्रकाश पडला आहे, हे ही सर्व समीक्षा एकत्रितपणे पाहताना ध्यानी येऊ शकते. तिची शक्तिकेंद्रे (आणि शबल स्थानेही) त्यातून स्पष्ट होऊ शकतात. त्याचबरोबर विविध प्रकारच्या या समीक्षण/परीक्षणांमधून समीक्षा व्यवहाराचाही एक आलेख मांडता येतो.

प्रा. एस. एस. नाडकर्णी यांनी 'रणांगण' समीक्षेची साठ वर्षे' या पुस्तकामधून हेच साध्य केलेले आहे. त्यामधून 'रणांगण'चे समग्रतेने पुनर्मूल्यांकन करण्याची संधी त्यांनी घेतली आहे. त्याचप्रमाणे समीक्षेचेही पुनर्विलोकन केले आहे.

एखाद्या कलाकृतीवरील सर्व समीक्षा जेव्हा अभ्यासायची असते, एकत्रितपणे तो अभ्यास वाचकांपुढे मांडायचा असतो, तेव्हा चटकन पुढे येणारा पर्याय संकलन-संपादनाचा असतो. 'रणांगण'वरचे लेखन विपुल प्रमाणात आहे, त्याचबरोबर त्यात काही मुद्दे, 'रणांगण'मधली अवतरणे यांची पुनरुक्तीही पुष्कळ आहे. त्यामुळे सर्व समीक्षा एकत्र करून प्रस्तावनेसह प्रकाशित करणे, हा मार्ग अव्यवहार्य ठरला असता.

यातले बरेचसे लेख आस्वादाची भूमिका घेता घेता त्या त्या समीक्षकाच्या सृजनशीलतेचाही आविष्कार करतात. त्यांना त्यांचा स्वतःचा असा रचनाबंधही आहे. त्यामुळे त्यांचे संपादन करणे हेही दुष्करच काम होते. त्याऐवजी नाडकर्णी यांनी 'रणांगण'चा एकेक पैलू, तिच्याविषयीचा एकेक प्रश्न लक्षात घेत त्यासंबंधीची विविध समीक्षकांची मते निवडक अंशांसह देण्याची पद्धती स्वीकारली आहे, ती उचितच आहे.

प्रस्तावना व समारोपासह 'रणांगण'च्या पहिल्या आवृत्तीच्या वेळी निर्माण केलेले गूढ, तिच्या संदर्भात उल्लेखिल्या गेलेल्या इंग्रजी कादंबऱ्या, 'रणांगण' हे शीर्षक, हॅर्टाची आत्महत्या, तिची पत्रे असे विविध विषय घेऊन एकूण सव्वीस छोट्या छोट्या प्रकरणांमध्ये ही चर्चा केली आहे. मात्र त्यांचा विषयानुक्रम वेगळा ठेवता आला असता. उदा० निवेदनपद्धतीशी संबंधित विवेचन सलग घेता आले असते. किंवा 'रणांगण' ही कुणाची कथा ? सारख्या मुद्याचा स्वतंत्र विचार करणे हा अध्यापनाच्या सवयीचा/ शिस्तीचा अवाजवी प्रभाव की काय, अशीही शंका येते.

परंतु हा मांडणीविषयीचा किरकोळ मतभेद वगळता, नाडकर्णींचे एकूण विश्लेषण अतिशय साक्षेपी आहे. मूळ कलाकृती आणि तिची समीक्षा दोहोंचेही गारूड प्रभावी आहे. परंतु नाडकर्णी यांनी चिकित्सकतेला केंद्रस्थानी ठेवून, तरीही सहृदयपणे या साऱ्या लेखनाची चिकित्सा केली आहे.

या अभ्यासामध्ये त्यांनी विविध मत-मतांतरे नोंदवीत त्यातली तथ्ये स्पष्ट केली आहेत. त्यासाठी त्यांनी केवळ 'रणांगण'संबंधी स्वतंत्रपणे केलेले लेखनच ध्यानात घेतलेले नाही, तर अन्य विषयांवर लिहिताना अनुषंगाने तिचा संदर्भ जिथे आला आहे, असे लेखही घेतलेले आहेत. पुस्तकाच्या शेवटी त्यांनी जोडलेली सूची, समीक्षणे, परीक्षणे, विविध लेखांमधील संदर्भ, उल्लेख अशा वेगवेगळ्या प्रकारच्या संदर्भांनी युक्त आहे. ती त्यांनी घेतलेल्या परिश्रमांची साक्ष देणारी आहे. प्रत्येक विषयासंबंधीचे विवेचनही तसेच आहे.

उदा० 'रणांगण' दीर्घकथा की कादंबरी, या मुद्याचा विचार करताना नाडकर्णी 'रणांगण'वर लिहिणाऱ्या समीक्षकांचे अभिप्राय देत 'कादंबरी' या प्रकारनामाचा प्रयोग ढोबळमानानेच झाल्याचे दर्शवितात. या संदर्भातील निश्चित बैठक प्रथम गंगाधर गाडगीळांच्या लेखनात कशी दिसते, हे सांगतात. डॉ. विलास सारंग व डॉ. भालचंद्र नेमाडे यांची इतरत्र या अनुषंगाने आलेली मतेही उद्धृत करतात. साकल्याने पाहता 'रणांगण' ही दीर्घकथा ठरते, असा आपला अभिप्रायही ते नोंदवतात.

हा ऊहापोह करताना ते प्रत्येक मुद्यावरील विविध लेखकांचे दृष्टिकोण काय आहेत, हे सांगतात. त्यांचे वेगळेपण, बलस्थान व विवेचनाला पडलेल्या मर्यादाही स्पष्ट करतात. उदा० 'रणांगण'वरचे बरेच लेखन हे आस्वादक समीक्षेच्या स्वरूपाचे आहे, त्यामुळे त्याला एक मर्यादा पडते. सैद्धांतिक समीक्षेच्या प्रांताला ते समीक्षक स्पर्श करीत नाहीत. श्रेष्ठ कलाकृतीचे निकष काय यासारख्या अनेक प्रश्नांची जाणीवही त्यांच्या लेखनातून व्यक्त होत नाही. मात्र त्यांच्यातील रसिक संवेदनशीलता सतत जाणवत राहाते. या तीव्र संवेदनशीलतेमुळेच डॉ. सरोजिनी वैद्य यांना 'रणांगण'ची

बीजे आत्मानुभूतीत असावीत असे पूर्वीच जाणवलेले आहे अशी आस्वादक समीक्षेच्या श्रेयाचीही नाडकर्णी आवर्जून नोंद घेतात. 'रणांगण'वरील सर्व लेखनाचे घटकशः विश्लेषण केल्यानंतर नाडकर्णी यांनी समारोपामध्ये काढलेले निष्कर्ष मौलिक आहेत. त्यामध्ये त्यांनी ऐतिहासिकदृष्ट्या थोडा अधिक विचार करायला हवा होता, असे वाटते. कारण 'रणांगण'च्या निर्मितीच्या वेळची मराठी साहित्यविश्वातली कादंबरीसंबंधीची संकल्पना आज बदललेली आहे. तसेच समीक्षेमध्ये आस्वादक समीक्षा एकेकाळी लोकप्रिय होती, कलावादी दृष्टिकोणाचा प्रभाव होता. नंतर सामाजिक-सांस्कृतिक दृष्टी महत्त्व पावू लागली आहे. 'रणांगण'बद्दलची मतमतांतरे या पार्श्वभूमीवरही तपासायला हवीत, असे वाटते.

काही बाबतीत थोडेसे अपुरेपण जाणवत असले, तरी एकंदरीत या पुस्तकाचे मोल त्यामुळे कमी होत नाही. जे अनेकविध संदर्भ आणि अनेक विषयांची चर्चा 'रणांगण'च्या निमित्ताने इथे एकत्रितपणे आलेली आहे, ती अपेक्षित उद्दिष्टांची पूर्ती करणारी आहेच. तसेच निरनिराळ्या व्यक्तींना 'रणांगण'चे विविध कलाकृतींशी जाणवलेले नाते, तिच्यातील लोकप्रिय व श्रेष्ठ कलाकृतीचे घटक सूचित करणारी चर्चा अशा काही गोष्टींचा विचार केला, तर पुढेही अभ्यास होऊ शकेल अशा दिशाही त्यातून सूचित होत आहेत. ■

मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411007. दूरध्वनी 020-25601269

**बोलीभाषा**

आपली सर्व पुस्तके प्रमाणभाषेत आहेत. त्यामुळे बोलीभाषेत व्यवहार करतात त्यांना आकलनाला खूप त्रास होतो.

'तुझे नाव काय आहे ?' हा प्रश्न बोली भाषेत असा आहे :

नावा पोरूल बातल मंता (माडिया), इन्ना पेर तानेद अंडा (कोलामी),

आमा जूमू चोज (कोरकू)

इतक्या भिन्न भाषेत बोलणाऱ्या मुलांवर माठी भाषा लादणे सर्वथा गैर आहे.

ज्या आदिवासी बोलींची मुळे आग्रेय आशियायी, द्रविडी परंपरेत आहेत, त्या भाषा समजायला खूप कठीण आहेत. याउलट वारली भाषा समजणे खूप सोपे जाते; कारण ती मराठीशी जवळ आहे.

त्यामुळे सुरवातीला दोन वर्षे तरी शिक्षकाने बोलीभाषेचा वापर करूनच अध्यापन करणे गरजेचे आहे. पण वास्तवातले चित्र भयंकर आहे. शिक्षक पाच ते सहा वर्षे आदिवासी भागात राहतात; पण त्यांना बोलीभाषा शिकून घ्यावी असे वाटत नाही.

हेरंब कुलकर्णी, 'महाराष्ट्रातील प्राथमिक शिक्षण : एक सामाजिक प्रश्न'

# आदिम भावना व वास्तवाचं चिंतनगर्भ कथारूप : उदय प्रकाशांच्या कथा

जया परांजपे

[परीक्षित पुस्तक : 'अरेबा परेबा आणि इतर कथा' - उदय प्रकाश. अनुवाद - जयप्रकाश सावंत. पेंग्विन बुक्स, नवी दिल्ली. पृष्ठे १५+१४९ किंमत : १६० रुपये]

हिंदी कथेला नवं वळण, नव्या जाणिवा व नवे शब्दरूप देणारे प्रसिद्ध लेखक श्री. उदय प्रकाश यांच्या 'अरेबा-परेबा आणि इतर कथा' या संग्रहाचा श्री. जयप्रकाश सावंत यांनी मराठीत सरस अनुवाद केला आहे.

संग्रहात एकूण अकरा कथा आहेत. पैकी 'डबी', 'नेलकटर', 'अपराध' व 'साह्यकर्ता' या आत्मकथनात्मक व बालपणातील अनुभव सांगणाऱ्या कथा आहेत. आजारी आईच्या बोटांची नखं घासून देण्याच्या प्रसंगातून उलगडत जाणारी 'नेलकटर' ही कथा बालवयातील मुलाच्या भावविश्वातील आईचं अनन्यसाधारण व तितकंच अपरिहार्य स्थान आणि तिच्या निधनानं आलेलं पोरकेपणाचं दुःख व्यक्त करते. 'साह्यकर्ता' कथेत लेखक वडिलांच्या आठवणींना उजाळा देतात. 'अपराध' ही अतिशय मार्मिक कथा आहे. आपल्या खोटेपणामुळे अपंग भावाला भोगाव्या लागलेल्या शिक्षेमुळे अपराधी भावनेतून मुक्त होण्यासाठी नायक भावाची क्षमा मागतो. पण भाऊ ती घटनाच विसरून गेला आहे हे कळल्यावर अपराधीपणाचं शल्य आयुष्यभर उरात बाळगण्याची अगतिकता भोगतो. 'डबी' काहीसा वेगळा विषय हाताळणारी कथा आहे. प्रकाशाचा कवडसा फक्त आपला म्हणून जपावा ही अदम्य ऊर्मी व त्या अनुरोधाने येणाऱ्या अनुभवाच्या स्वायत्ततेचं चित्र इथं उभं राहतं. 'अभिनय' ही स्वतःचं दुःख विसरून किंवा सोसता-सोसता दुसऱ्यांना हसायला लावणाऱ्या नटाची गोष्ट आहे. 'नोकरी'मध्ये व्यवस्था व शैक्षणिक दिवाळखोरीच्या विडंबनाच्या माध्यमातून घेतलेला वेध आहे. 'छत्र्या' ही दीर्घकथा किशोर वयातील मुलांच्या मनात उमलू लागलेल्या प्रेमभावनेचं व स्पर्शानुभवाचं अत्यंत तरल व सुंदर चित्रण करणारी कथा आहे. 'छप्पन तोळ्यांचा कमरबंद'मध्ये आर्थिक ओढग्रस्तीतून उद्‌भवणाऱ्या नातेसंबंधातील अनेक पैलू काहीशा उबग आणणाऱ्या वातावरणात उलगडत जातात. 'अरेबा-परेबा' ही शीर्षककथा बालकाचं भावविश्व आणि आई-मुलातील दृढ

नातेसंबंधाचं चित्रण करण्याबरोबर कोमल, पवित्र व निरागस जीवनावरील असुरक्षिततेच्या दारुणतेचं भान देणारी सुंदर कथा आहे. 'पॉल गोमरांची स्कूटर' या कथेत आज सर्वत्र व्यापलेला बाजारवाद, भोगवाद, बेगडीपणा, महानगरातील कुत्सित वास्तव व या सगळ्यामध्ये कुचंबलेल्या, दबलेल्या सामान्य माणसाचं जिणं, त्याच्या इच्छा-आकांक्षा, स्वप्नं व आपल्या नैतिक-आदर्शांसमवेत व्यवस्थेपुढं, वास्तवापुढं वेडं-पिसं होणं यांचं चित्रण आहे. शेवटची 'दिल्ली' ही कथा मगरूर सत्तेपुढे उभं ठाकण्याचं बळ देते.

या कथांच्या अनुवादाची प्रेरणा अनुवादकाने म्हटल्याप्रमाणे कथांतील चिंतनभर्गता आणि वास्तवाचं उत्कट भान ही आहे. 'जे नाहीय त्यासाठी जे आहे ते पणाला लावण्यात कसलं शहाणपण आहे ?', 'त्याच दिवशी मला समजलं की एकमेकांच्या संकटांच्या प्रसंगांत आपण फक्त प्रेक्षक असतो.', 'जगातलं प्रत्येक कोमल, पवित्र आणि सुंदर जीवन या क्षणी गंभीर धोक्याच्या छायेत आहे. बिबट्यांना आपण असेच पहात राहणार आहोत का ?' अशा अनेक संदर्भांत अनुभवातून उमटणारं जीवनभाष्य आणि व्यक्तिगत अनुभवांचं सामूहिक जीवनसत्यानं होणारं कलापूर्ण रूपांतरण उदय प्रकाश यांच्या कथांचं बलस्थान म्हणावं लागेल.

उदय प्रकाश स्वत: म्हणतात त्याप्रमाणे माणसाचा एकाकीपणा, अगतिकता, असुरक्षितता आणि भय हे त्यांच्या कथांचं मूळ बीज आहे. या व अशान्त भावना भोगत-जगत असताना नियतीच्या अटळतेचं भान व आपल्याप्रमाणे इतर अनेकजण हे भोगत असल्याची जाणीव त्यांच्या कथांना वैचारिक गांभीर्य देते. म्हणून त्यांच्या कथा भावगर्भ असल्या तरी भावुक किंवा भारावलेपणाचा अनुभव देत नाहीत. याचं आणखी एक कारण असं आहे की या सगळ्याकडे पाहण्याची, त्याचं साहित्यात रूपांतर करण्याची लेखकाची दृष्टी व प्रक्रिया सुद्धा भावुक नसून कलात्मक तटस्थतेची आहे. लेखक स्वत: त्यात गुंतत नाही व वाचकालाही भावनेच्या लाटेत वाहू देत नाही. त्यामुळे या कथा लेखकाप्रमाणेच मननशील व पौढ वाचकांची अपेक्षा ठेवतात. जीवनवास्तवाचं उत्कट भान असूनही त्याकडे पाहण्याची लेखकाची दृष्टी अशीच कलात्मक तटस्थतेची आहे.

या कलात्मक तटस्थतेमुळेच लेखकाच्या भाषेतही अभिनिवेश व भावनिक गुंतवणूक नाही. भाषेचा समर्पक प्रयोग, कथनाची आगळी-वेगळी शैली व घटना-प्रसंग किंवा पात्रांचं अंतरंग उलगडण्याचं लेखकाचं कसब या सर्वच बाबतीत समकालीन लेखकांपेक्षा ते वेगळे ठरतात. इथे त्यांच्या कथांची लघुता व दीर्घता यांचाही विचार करावा लागेल. 'अपराध', 'डबी' यासारख्या कथा मुक्तकासारखा उत्कट पण एकनिष्ठ

भाव जपत अनुभवांचं संक्षिप्त रूप धारण करतात, तर 'छत्र्या', 'पॉल गोमरांची स्कूटर', सारख्या कथा जीवनातील कितीतरी संदर्भ – कधी अवांतर वाटावेत असेही संदर्भ – लपेटत दीर्घ रूप घेतात. पण विचार केल्यास जाणवते की लेखक स्वत: म्हणतात त्याप्रमाणे या लघु-कादंबऱ्या नाहीत; कारण कादंबरीप्रमाणे व्यापक जीवनसत्यापेक्षा व्यापक जीवन संदर्भातून कथेची एकात्मता त्या जपतात. जीवनदृष्टी. जाणिवा, शैली व रचनेचा घाट या सर्वच दृष्टींनी उदय प्रकाशांच्या कथा वैशिष्ट्यपूर्ण ठरतात. म्हणूनच अनुवादाच्या दृष्टीने त्या आव्हानात्मक आहेत.

कथानुवादात अनुवाद प्रक्रियेप्रमाणेच अनुवाद-मीमांसेमध्येही शब्द, पदबंध, उपवाक्य, वाक्य व संपूर्ण प्रोक्ती (डिस्कोर्स) या क्रमाने विचार करता येईल. मूळ भाषेतील एका शब्दासाठी संदर्भानुसार लक्ष्य भाषेत एकाधिक शब्दांचा प्रयोग होऊ शकतो. जसे या अनुवादात 'शरारत'साठी चेष्टा, खट्याळपणा, खोड्या असे शब्द वापरण्यात आले आहेत. 'नन्हे'साठी 'ही इवलीशी', लहानगे, बाळे, चिमुकले अशा शब्दांचा उपयोग समर्पक आहे. मराठीचा बाज राखत असताना जोडलेले अधोरेखित शब्द या दृष्टीने पाहण्याजोगे आहेत. 'इकडे ये तर <u>खरं</u>', '<u>मेला</u> यमदूत'. <u>बचमजी</u> 'ये <u>रे</u>' 'सांग <u>ना</u>', 'नव्हतं<u>च</u>', 'असं<u>ही</u>', 'बसलो न बसलो <u>तोच</u>', '<u>तीनेक</u> कि.मी.', 'पाण्याचा थेंब<u>ही</u>' 'नाव नव्हतंच <u>मुळी</u>' अशा शब्दसंघटनेतून गर्भितार्थ व पात्रांमधील परस्पर भावबंधही परिणामकारकपणे उलगडत जातात. या उलट 'माकडा'साठी 'वानर', 'स्वयंपाक आटोपून'साठी 'जेवण बनवून', 'आई गेलेली होती'साठी 'आई मरून गेली होती', 'रोज'ऐवजी 'दर दिवशी' असे शब्दप्रयोग व 'राखी बांधली जाते.', 'मातीच्या ढेकळाला', 'धक्का देऊन कोसळवलं', 'अंगण तपासून पाहिलं' इत्यादी रचनांतील भाषेची कृत्रिमता खटकते.

तथापि शब्दापासून प्रोक्तीपर्यंत सरस अनुवादाची अनेक उदाहरणं दिसून येतात. 'मेली स्कूटर', 'शिंची हिंदी', 'चर्रर आवाज', 'हल्दिया'साठी नव्याने घडवलेला 'हळदिव्या धुळीने' शब्द. 'कई-कई बार'साठी 'कितीतरी वेळा' आणि उलट 'अंत में'साठी 'शेवटी-शेवटी', 'रोते हुए'साठी 'रडत-रडत' असे कितीतरी शब्दप्रयोग व वाक्यरचनेमध्ये अनुकूल बदल करून केलेल्या अनुवादात स्वाभाविकता, प्रवाह व परिणामकारकता दिसून येते.

कथानुवादात घटना, पात्रं, पात्रांचे आपापसातील संबंध या सगळ्यांना असणारी स्थल-काळ व वातावरणाची चौकट महत्त्वाची व तितकीच आव्हानात्मक असते. या अनुवादात ही अडचण फारशी जाणवत नाही. वनस्पती, फळं-फुलं, सण, उत्सव असे काही संदर्भ येथे आहेत; पण त्यामुळे अनुवादात बाधा आल्याचे जाणवत नाही.

हिंदी साहित्यातील पंत, निराला या कवि-लेखकांचे उल्लेख आहेत. कवितांचे मराठीत पद्यानुवादच केलेले आहेत. 'नोकरी' कथा महापंडित राहुल सांस्कृत्यायन यांच्याभोवती गुंफलेली असल्यामुळे त्यांच्या लेखन व व्यक्तिमत्त्वाचा परिचय अपेक्षित असला तरी ते प्रतीकात्मक रूपात आल्याने व विडंबन महत्त्वाचे असल्याने फारशी अडचण मराठी वाचकाला येऊ नये. व्यंग्यात्मक उक्तींमध्ये शब्दानुवादाचे काम होत नसल्याने मूळ शब्द तसाच ठेवणे किंवा रूपांतरण हे उपाय असू शकतात. या अनुवादात 'संपादकाच्या पदासाठी श्री. गिरगिट योग्य वाटतात' या वाक्यात अनुवादकाने 'गिरगिट' शब्द तसाच ठेवला आहे; तर 'आका डाका चलाना'साठी 'इथं इथं नाचरे मोरा' असे रूपांतरणही केले आहे.

कथांतील संवेदना, गर्भितार्थ व शैलीचे जतन करीत कुशलतेने अनुवाद केल्यामुळे हिंदीतील एका अनोख्या व ताकदीच्या लेखकाचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचे मोलाचे काम श्री. सावंत यांनी केलेले आहे. ■

हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे. दूरध्वनी 25601255 / 56

## जर्मन-फ्रेंच भाषक आणि इंग्रजी

जर्मनी-फ्रान्ससारख्या प्रगत युरोपीय देशांतही गेल्या १५-२० वर्षांत व्यवहारातला इंग्रजीचा वापर खूप वाढला आहे. शाळा-महाविद्यालयांमध्ये इंग्रजी ही प्रथम क्रमांकाची परकीय भाषा झाली आहे. वीस वर्षांपूर्वी जर्मन किंवा फ्रेंच लोक इंग्रजी बोलायला अजिबात राजी नसायचे. परदेशी व्यावसायिकां-बरोबरचे पत्रव्यवहार, करारही आग्रहपूर्वक जर्मन किंवा फ्रेंचमध्येच करत असत. या वृत्तीत आता फरक पडला आहे. तेथे व्यावसायविषयक पत्रव्यवहारच काय; पण कित्येक शास्त्रीय लेख-प्रबंधासाठीही इंग्रजीचा वापर होताना दिसतो. स्वभाषेविषयीचा पूर्वीचा टोकाचा आग्रह सोडून जर्मन-फ्रेंच भाषक इंग्रजीचा अधिक सहिष्णुतेने आणि सढळपणे वापर करताना आढळतात. याचप्रमाणे तुर्कमेनिस्तान किंवा कझाकस्तान यांसारखे लहान देशही इंग्रजी आत्मसात करण्याच्या प्रयत्नांना अग्रक्रम देत आहेत. मात्र, इंग्रजीवर प्रभुत्व मिळवण्यासाठी शालेय शिक्षणाचे माध्यमच इंग्रजी असायला पाहिजे, अशा विचाराची चर्चा यांपैकी कोणत्याही देशांत होताना दिसत नाही.

डॉ. नीती बडवे, दै.सकाळ, ११.१२.२००७

# मराठीची आवड वाढविण्यासाठी

नीना भेडसगावकर

गेली अनेक वर्षे मराठीचे अध्यापन करणाऱ्या काही शिक्षकांना सतत एक खंत वाटत राहिली आहे, की 'विद्यार्थ्यांच्या मनात मराठी पुस्तके वाचण्याची आवड निर्माण होत नाही. मातृभाषा असून मुले मराठी चांगले बोलू-लिहू शकत नाहीत, त्यांना कमी गुण मिळतात आणि विद्यार्थ्यांच्या एकूण विकासावरही त्याचा परिणाम होतो.'

मुलांबद्दल वाटणाऱ्या या काळजीतूनच पुण्यातील काही शिक्षकांनी एकत्र येऊन नुकतीच 'अक्षरयात्री' या मंडळाची स्थापना केली आहे. विद्यार्थ्यांसाठी एका चांगल्या उपक्रमाचे आयोजन केले आहे. या उपक्रमात पुण्यातील जास्तीत जास्त शाळांमधील इयत्ता ९वी च्या १८० विद्यार्थ्यांचा एक संघ तयार केला आहे, त्याचे नाव 'अक्षरमैत्र'. 'अक्षरयात्री' या शिक्षकांच्या मंडळामध्ये या सर्व शाळांतील पंचवीस शिक्षक व काही पालकप्रतिनिधी कार्यरत झाले आहेत. 'अक्षरयात्री'च्या वतीने ११ ऑगस्ट २००७ पासून दर महिन्याच्या दुसऱ्या व चौथ्या शनिवारी संध्याकाळी ५ ते ६.३० या विद्यार्थ्यांच्या सोयीच्या वेळेत, मध्यवर्ती अशा 'पत्रकार भवन' सभागृहात, उत्तम साहित्यातील काही निवडक भागांचे वाचन केले जाणार आहे.

या वाचनात प्रसिद्ध कलाकारांनी आनंदाने सहभागी होण्याचे मान्य केले आहे. यासाठी विद्यार्थ्यांना सहा महिन्याच्या प्रथम सत्रासाठी (१२ कार्यक्रम) रु.२००/- इतके माफक शुल्क आकारले जाणार आहे. अध्यक्षा कवयित्री संजीवनी बोकील यांच्या संकल्पनेतून हा प्रकल्प आकार घेत आहे. सहभागी होणाऱ्या शाळांमध्ये इंग्रजी-मराठी दोन्ही माध्यमांच्या शाळा आहेत. अंधशालेतील विद्यार्थिनींच्या 'फी'ची व्यवस्थाही अक्षरयात्रीने केली आहे. अक्षरयात्रीतील या सर्व शिक्षकांचे वैशिष्ट्य म्हणजे ज्या विद्यार्थ्यांना या प्रकल्पाचे सभासद होण्याची इच्छा असून, आर्थिकदृष्ट्या शक्य नाही त्यांच्यासाठी प्रत्येक शिक्षकाने शुल्क भरले आहे. उपक्रम अर्थपूर्ण करण्यासाठी काही उद्योजक व व्यक्ती यांनीही उत्तम प्रतिसाद दिला आहे. गावोगावच्या शिक्षक-पालकांनी आपापल्या ठिकाणी हा उपक्रम करावा, अशी अपेक्षा आहे. ■

दै. सकाळ

# ---आणि समाधान

अशोक रा. केळकर

-१-

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' २५:१ : ७४-५, हिवाळा २००७. हा सात शंकांचा गुच्छ आहे. शंका १ (खुर्ची आणि टेबल विकत घेतलं/ली), शंका २(मनोज आणि नितीनला), व शंका ५ (हुषार निलेश आणि रमेश) या वाक्याच्या पोटात आलेल्या समयोगी अन्वयाबद्दल आहेत. [बीजगणितात अ (ब+क)मधला कंस सोडवून अब+अक हाती येते तसाच काहीसा प्रकार इथे आहे हे लक्षात घेतल्यास या रचना समजायला सोपे जाईल असे वाटते.]

खुर्ची आणि टेबल विकत घेतली (नपुंसक बहुवचन) ही तर्कतः मूळ रचना, बोलण्याच्या, कधी लिहिण्याच्याही ओघात जणू व्याकरणिक संधी होऊन टेबल – घेतलं असं नपुंसक एकवचन रूप होतं. पाश्चात्य परंपरेत अशा संसर्गजन्य सुसंवादाला अट्रॅक्शन म्हणत असत. (पहा : केळकर १९९७ : ६ अ,ब.)

तर्कतः मूळ रचना मनोज आणि नितीन यांना. अनौपचारिक बोलण्यात मनोज आणि नितीनना येऊ शकते. मूळ रचना मनोजला आणि नितीनला अशी असती तर दोन स्वतंत्र सांगण्याच्या क्रिया दर्शविल्या गेल्या असत्या.

हुषार निलेश आणि रमेश यातली संदिग्धता दूर करण्याचा एक मार्ग रमेश आणि हुषार निलेश म्हणणे. दुसरा मार्ग हुषार निलेश वर आरोही सुर आणि 'आणि रमेश'वर अवरोही सुर बोलण्यात घालणे.

शंका ३ आणि शंका ४ यांमधे तर्कतः मूळ रचना 'धार आणि काठ' हे पुस्तक आणि माझ्या मते तरी हा विचार--, वरील मुद्दे लक्षात घेता कॉलिंगवुडच्या ह्या मताच्या... अशा आहेत. संज्ञापनाच्या ओघात प्रकट क्रम बदलला जाऊन अन्वयरहितता उत्पन्न होते आणि व्याकरणिक निवेश, परेन्थिसिस तयार होतो. प्रकट क्रम बदलण्याची कारणे वेगवेगळी असू शकतात : पुस्तक बोलल्या / लिहिल्या नंतर धार आणि काठ हे शीर्षक घालायचे आठवल्यामुळे, किंवा मूळ क्रम ठेवला तर 'धार आणि काठ' ह्या शीर्षकाला वाजवीपेक्षा जास्त महत्त्व मिळेल ते टाळण्यासाठी. शंका

४ खाली मराठी विश्वकोशातली दोन उदाहरणे दिली आहेत (श्रेष्ठ, कदाचित् सर्वश्रेष्ठ, तत्त्ववेत्ते, बहुतेक जाती, निदान अंशत:) त्यातला मूळ क्रम वेगळ्या प्रकारचा आहे. निविष्ट पदबंध आधीच्या स्थानावरून पुढे खेचलेला नसून नंतरच्या स्थानावरून मागे खेचलेला आहे : श्रेष्ठ तत्त्वेवेत्ते..., कदाचित सर्वश्रेष्ठ तत्त्ववेत्ते..., वृक्षवासी असतात, निदान अंशतः वृक्षवासी असतात. इथे प्रकट क्रम बदलण्याचे कारण निविष्ट पदबंध नंतरच्या स्थानावरून मागे खेचून विस्तार टाळला आहे.

यातल्या काही रचना इंग्रजी रचनांच्या प्रभावामुळे आल्या असणे शक्य आहे. (पहा : नेमाडे १९९०). (विरामचिन्हांबद्दल पहा : केळकर १९८९. शंका आवडल्या. उत्तर द्यायला मजा आली.)

---

**संदर्भ :** केळकर, अशोक रा. १९८९. मराठी लेखनातील विरामचिन्हांचा उपयोग, भाषा आणि जीवन दिवाळी १९८९. पुनर्मुद्रण :मध्यमा, मेहता. पुणे १९९६.

केळकर, अशोक रा. १९९७ Language in a Semiotic Perspective : The Architecture of a Marathi Sentence Shubhada-Saraswat, Pune.

नेमाडे, भालचंद्र. १९९०. The Influence of English on Marathi पणजी. राजहंस.

**-२-**

संदर्भ : भाषा आणि जीवन २५:३:६०-१ पावसाळा २००७ राजीव नाईक. तत्सम शब्दांतील ऋ चा देशी उच्चार ओरिया, मराठीमधे रु होतो, बांगला, हिंदीमधे रि होतो, गुजराती, राजस्थानी मधे र होतो असे साधारणपणे म्हणता येईल. मराठीत हल्ली रु ऐवजी रि होतो तो हिंदीच्या प्रभावाने असे साधारणपणे म्हणता येईल. पण मराठीत ऋण ऐवजी रीण हा उच्चार हिंदीच्या प्रभावाच्या आधीपासूनचा आहे.

पद्य चालीवर म्हणताना किंवा गीत गाताना ऱ्हस्व स्वरानंतर जोडाक्षर किंवा अनुस्वार आला तर संबंधित अक्षर (सिलबल्) गुरू होते. हे गुरुत्व वास्तविक नंतरचे व्यंजन लांबवून दाखवायचे, तसे न करता तो ऱ्हस्व स्वर लांबवून दाखवतात (भक्·ती ऐवजी भक्·ती) ते मात्र खटकते. असे होण्याचे कारण कळत नाही.

इंग्रजी शब्दांच्या देवनागरी लिप्यंतराबद्दलची निरीक्षणे आता पाहू. ई-मेल ऐवजी इ-मेल नको, फीमेल, सी-मेल शी तुलना करावी. मराठी शब्दांतही इ/ई ची, उ/ऊ ची अदलाबदल होते : विटा, वीट, कूट, कुटा ऐवजी विट, वीटा, कुट, कूटा सापडू शकते. इंग्रजी शब्दांचीही तीच गत : प्रीटी, टिचर, फ्रुट, पूडिंग. दीर्घत्वाचे प्रस्थ असे नसून ऱ्हस्वदीर्घ भेदाची ऐसीतैसी असा प्रकार आहे. ब्रॅन्ड, टिन्डफुड. इंग्रजीतील n चे लिप्यंतर सरसकट न् करण्याचा हा प्रकार आहे.

पोस्ट ऐवजी पोस्ट् न लिहून चालण्यासारखे आहे, पण पोस्ट्स् ऐवजी पोस्टस् लिहून चालण्यासारखे नाही; कारण पोस्टस्‌चा उच्चार लोटस् सारखा होण्याची बरीच शक्यता आहे. feats आणि fetus एकच होईल.

इंग्रजी शब्दातील शब्दाच्या शेवटचे एकेरी व्यंजन पाय मोडून लिहावे असे आणखी एक ठिकाण आहे. miss, puss, etch, P.F. देवनागरीत लिहिताना मिस्, पुस्, एच्, पी. एफ. लिहिणे योग्य, नाही तर त्यांचे उच्चार स्मित, गुण, तेज, रेच, सेफ च्या वळणावर जाण्याची बरीच शक्यता आहे. इंग्रजी f,e,m,n,s,z या अक्षरांच्या नावात ऱ्हस्व ए आहे; पण h अक्षराच्या नावात दीर्घ ए आहे. ते नाव कधीकधी aitch असेही लिहिले जाते हे लक्षात ठेवलेले बरे, म्हणून पी-एच.डी. पाहिजे. 'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी अंकात Noam हे नाव नोअम असे आवरण पृष्ठ १ वर छापले आहे ते बरोबर आहे. आवरणपृष्ठ २७ वर छापलेले नोम चूक आहे.

- ३ -

**संदर्भ :** भाषा आणि जीवन. दिवाळी २००७. रावसाहेब मुरलीधर काळे

प्रथम की अव्यय आणि स्वल्पविराम याबद्दल बोलू. की अव्यय फार्सी भाषेतील के(ऱ्हस्व ए) वरून हिंदी-उर्दू, गुजराती, आणि मराठी भाषांमधे आलेले आहे. संस्कृत किम्, किमु या प्रश्नार्थकाचा उच्चार (मराठी की पूर्वी कीं असा उच्चारत असत) आणि अर्थ यांच्या छटाही कुठेकुठे मिसळल्या आहेत. उच्चारातील फोड आणि त्यामुळे स्वल्पविराम याबद्दलची दुविधा यातून आलेली. काळे ठासून सांगतात तशी एकजिनसी स्थिती नाही. माझ्या निरीक्षणात काय दिसते ते आता नोंदवतो. (एक दंड लहान थांबा, दुहेरी दंड मोठा थांबा). मराठी रूप की, गुजराती रूप के (विवृत्त ऱ्हस्व उच्चार, पूर्वी कि), हिंदी-उर्दू रूप कि अशी आहेत. (तुलनेसाठी गुजराती, हिंदी उदाहरणेही अधूनमधून दिली आहेत - आपली आंतरभारती जाणीव तेवढीच वाढावी !)

- उपयोग १ किंवा, अथवा (पर्यायवाचक समयोगी-विशेषत: प्रश्नार्थ वा संदेहसूचक वाक्यात) उद्या पाऊस पडेल (,) की परवा ?

  परवा की तेरवाची गोष्ट.

  जाओगे कि नहीं ? बनारस कि इलाहाबाद कि लखनऊ जाओगे ?

  (मोरोपंताच्या 'संशयरत्नमाला'मधे या 'कीं'चा उपयोग वारंवार केला आहे.)

  कह्युं के ?

  (मराठीत मात्र : सांगितलं का ?)

● उपयोग २ म्हणजे, मग, नंतर        तो आला (,) की आपण निघू.
तो आला रे आला, की (लगेच) आपण निघू.
मेरी पत्नी जानेवाली थी कि (इतने में) बीमार हो गयी.

● उपयोग ३ (आग्रहसूचक पर्याय नसल्याचे सूचन)
पाऊस पडेल की !      मी पुस्तक देतो की !        घरीच ये की !

● उपयोग ४ गौणयोगी (कारण, प्रयोजन, परिणाम)
त्याला उशीर झाला, कारण (की) गाडी लवकर मिळाली नाही.
पोलिसांनी असा सापळा रचला, की (परिणामी) गुन्हेगार पकडला गेला.
तो असा गायला, की (परिणामी) लोक थक्क झाले.
गुजरातीत : कारण के, जेम के, केम के
हिंदीत : क्यों कि, ता-कि

● उपयोग ५ गौणयोगी पण अंत्यविस्थापित
तो हे मला जमणार नाही असं म्हणाला. (तर्कतः मूळ रचना)
त्यावरून : तो (असं) म्हणाला, की हे मला जमणार नाही.
तो म्हणाला की, हे मला जमणार नाही.
चोरानं जी पिशवी बाहेर पडली होती ती पळवली. (तर्कतः मूळ रचना)
त्यावरून : जी पिशवी बाहेर पडली होती ती चोरानं पळवली. (आद्यविस्थापित)
चोरानं ती पिशवी पळवली की जी बाहेर पडली होती. (अंत्यविस्थापित)
गुजराती : नळराज, के जेने वनवास भोगाववो पड्यो हतो, ते---
हिंदी : जैसे कि मैं पहले कह चुका हूं, उसने शादी कर ली.
बात यह है (,) कि उसने शादी कर ली है.
बात यह है कि, उसने शादी कर ली है.
उसने पूछा, कि क्या उसने शादी कर ली है ?
मुझे अफसोस है (,) कि आप शादी में आ नहीं पाएंगे.

नंतर एकाच संदर्भात 'डुंबरे' आणि 'डुम्बरे' अशी वेगवेगळी मुद्रणांतरे आल्या-बद्दल काळे यांनी नापसंती नोंदली आहे. 'भाषा आणि जीवन' कार्यालयाने एक स्टाइलशीट तयार करून जारी करायला पाहिजे असा मी सल्ला देईन.

नंतर पीएच्.डी.बद्दल काळे यांनी नापसंती नोंदली आहे. मी महामंडळाशी सहमत नाही; पण एच् नको असे मलाही वाटते. पण कारण मात्र वेगळे आहे, की जे आपण पूर्वीच नोंदवले आहे. ■

7, धनंजय, 759/83, भांडारकर रस्ता, गल्ली क्र. 6, पुणे 411 004.

# मंदर, मंदार, मांदार

लीला अर्जुनवाडकर

संदर्भ : ''भाषा आणि जीवन'च्या दिवाळी ०७ अंकातील पृ. ७५ वरील टीप. या टिपेचा मुद्दा मी फोनवर सांगितला होता. माझ्या पाठाप्रमाणे (मेरुमंदार धाकुटे) 'मंदर' (पर्वताचे नाव) या संस्कृत शब्दातील 'द'चे दीर्घीकरण झाले व 'मंदार' हा शब्द झाला मराठीत. दुसऱ्या एका पाठाप्रमाणे (मेरुमांदार धाकुटे) 'मांदार' या शब्दात 'मंदर' या मूळ संस्कृत शब्दातील 'म' व 'द' दोन्हीचे दीर्घीकरण झाले आहे. कोणता पाठ समोर आहे ते लक्षात घेऊन दीर्घीकरणाचे उदाहरण स्पष्ट करायला हवे.

टीप अशी हवी : मारुतिस्तोत्रातील 'मेरुमंदार धाकुटे' यातील 'मंदार' हा शब्द 'मंदर' या मूळ संस्कृत शब्दातील 'द'च्या दीर्घीकरणाने सिद्ध झाला आहे.

संस्कृतात 'मंदार' असाही शब्द आहे. (हे बहुधा एव्हाना कोणी तरी कळवले असेलच !) पण ते एका देवतरूचे व फुलाचे नाव आहे. 'मंदर' हे पर्वताचे नाव स्वतंत्र आहे. म्हणून टिपेचा प्रपंच केला. या पत्राचाही. ■

---

**लेखक-परिचय**

- **डॉ. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर** : जन्म १९२६. अद्वैत-वेदान्त-कोविद ही पदवी १९४१मध्ये. १९४६च्या शालान्त परीक्षेत जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती. संस्कृत विषयात एम.ए., स.प. महाविद्यालयात संस्कृतचे १८ वर्षे अध्यापन. मुंबई विद्यापीठात सात वर्षे मराठीचे प्रपाठक. परदेशातही अध्यापन. मम्मटकृत 'काव्यप्रकाश' व मोरो केशव दामलेकृत 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथांचे सटीक, चिकित्सक संपादन. 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद', 'मराठी व्याकरणाचा इतिहास', 'मोरो केशव दामले : व्यक्ति आणि कार्य' इ० अनेक ग्रंथ प्रकाशित. साहित्यसम्राट न.चिं. केळकर पारितोषिक, पाणिनी पुरस्कार, कालिदास पुरस्कार, बेहेरे सुवर्णपदक इ० अनेक पुरस्कारांनी सन्मानित.
- **डॉ. स्वाती कर्वे** : मॉडर्न महाविद्यालय, पुणे ५ येथे मराठीच्या प्राध्यापक. एकूण सात पुस्तके प्रकाशित. 'भारतीय सण उत्सव' आणि 'दशावतार, चिरंजीव व पंचकन्या' ही पुस्तके कलकत्त्याच्या राजा राममोहन राय राष्ट्रीय ग्रंथालयात निवडली गेली. तसेच महाराष्ट्र राज्याच्या 'खडू-फळा' योजनेतही निवड. 'स्त्री विकासाच्या पाऊलखुणा' या संपादित ग्रंथास राज्य पुरस्कार. 'स्त्रियांची शतपत्रे' = (१८५० ते १९५० मधील स्त्रियांच्या पत्रव्यवहाराचे

सामाजिक मूल्यमापन.) या प्रकल्पाला महाराष्ट्र फाऊंडेशनची संशोधन शिष्यवृत्ती. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या संशोधन प्रकल्पात - 'स्त्री साहित्याचा मागोवा' खंड १ व २मध्ये लेखन. तीन वेळा 'आदर्श शिक्षक' पुरस्कार.

- **शुभानन गांगल** : व्यापारी नौकानयन अधिकारी(स्वेच्छानिवृत्त). 'लाटांच्या सावलीतून' हा कवितासंग्रह प्रकाशित. पद्यातील विविध छंद, गेयता यांचा संगणकाच्या माध्यमातून शोध. त्यासंबंधी तीन पुस्तके.
- **डॉ. विद्यागौरी टिळक** : मराठी विषयात एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. सोमेश्वरनगर (जिल्हा पुणे) येथे १९८६ ते १९९६पर्यंत अध्यापन. १९९६पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक. 'मराठी वाङ्मयाची सद्यःस्थिती' (सहसंपादन), 'वाङ्मयेतिहास-लेखन - स्वरूप आणि संपादन' (संपादन),'समीक्षा-विविधा' (संपादन) ही प्रकाशित पुस्तके. कथा, कविता, लेख इ० स्फुट लेखन.
- **डॉ. स्नेहल तावरे** : मराठी विषयात एम.ए.,पीएच.डी. मॉडर्न महाविद्यालय, पुणे येथे मराठीचे अध्यापन. 'स्नेहवर्धन' या प्रकाशन संस्थेच्या संचालक.
- **डॉ. माणिक धनपलवार** : उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद येथील मराठीचे (निवृत्त) प्राध्यापक. अनेक पुस्तके व शोधनिबंध प्रकाशित.
- **डॉ. जया परांजपे** - एम.ए.पीएच.डी., पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागात प्रपाठक. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.
- **डॉ. रमेश पानसे** : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजकार्य व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५पेक्षा अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणपत्रिका' मासिकाचे संपादक. 'बाल-शिक्षण संशोधन व विकास केंद्राचे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित. महत्त्वाचे ग्रंथ-'शिक्षण आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदुसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ'.
- **विवेक भट** : रासायनिक अभियंता. संस्कृत व भाषाविज्ञान या विषयांत एम.ए., भाषाविज्ञानात पीएच.डी.साठी आय.आय.टी.(मुंबई) येथे संशोधन.
- **डॉ. मिलिंद मालशे** - आय.आय.टी.(मुंबई)मध्ये इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजीमधून लेखन. सौंदर्यशास्त्राचेही अध्यापन, 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन'-सह मराठी व इंग्रजी पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.

---


(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु.१२५/-,पंचवार्षिक वर्गणी रु.५५०/-,व्यक्तीला रु.१००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना** : वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, डिमांड ड्राफ्टने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. डी.डी. व धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावेत. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** वर्गणीसोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर** : पूर्ण पान रु.२,५००/-, अर्धे पान रु.१,५००/-, पाव पान रु.८००/-, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.


---

अनुक्रमणिका

